संगीत

# वाह्वा रे जांवई

[ गद्यपद्यात्मक नाटक ]

लेखक,

केसरीनाथ सिताराम धुमे.

सन. १९३९

किंमत १२ आणे.

मुद्रक—तुकाराम बाजी काराणे, तुकाराम प्रिंटींग प्रेस, मांगलवाडी गिरगांव मुं. ४

# पात्रें.

सन १९३९ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या १७ तारखेस मुंबई बॉंबे थिएटरांत या नाटकाचा पहिला प्रयोग झाला त्यावेळी प्रयोगांत भाग घेतले त्यांची नांवें:—

## पुरुष पात्रें.

| | |
|---|---|
| भोलानाथ.—एक सुखवस्तु गृहस्थ व प्रभेचा बाप. | श्री. के. सी. धुमे. |
| भाई:—भोलानाथाचा भाचा. | ,, शां. वा. तेंडुलकर. |
| कामेश्वर:—भोलानाथाचा जांवई. | ,, पां. ल. देशपांडे. |
| बंडोबा:—कामेश्वराचा वडील बंधु. | ,, वा. आ. सावंत. |
| दादासाहेब:—कामेश्वराचा सापत्न बंधु | ,, वि. ना. परब. |
| विरोधक:—कामेश्वराचा मेहुणा. | ,, स. य. देसाई. |
| बापुराव:—सॉलिसीटरचा क्लार्क, कामेश्वराचा चाहता. | ,, य. रा. जोशी. |
| अमरनाथ:—विषयेचा बंधु. | ,, रा. रा. काकोडकर. |
| बलंभट:—कामेश्वराचा पुरोहित. | ,, द. प. तांबट. |
| शीवजी:—भोलानाथाचा परिचित. | ,, ,, ,, ,, |
| समर्थ:—भोलानाथाचा वकील. | ,, शां. वा. तेंडुलकर. |
| गंभीर:—कामेश्वराचा वकील. | ,, मा. आ. कामत. |
| न्यायाधीश } —कोर्टांतील अधिकारी. | ,, मा. रा. आजगांवकर. |
| शिरस्तेदार } | ,, रा. स. काकोडकर. |

## स्त्री पात्रें.

| | |
|---|---|
| प्रभा उर्फ नर्मदा:—भोलानाथाची मुलगी व कामेश्वराची पत्नी. | मिस रतन. |
| माई:—कामेश्वराची आई. | श्री. तु. सावंत. |
| म्हाळसा:—कामेश्वराची बहिण. | ,, र. मु. कामोलकर. |
| विषया:—बंडोबाची पत्नी कामेश्वराची चाहती | ,, रा. रा. सावंत. |
| सुलु:—विषयेची मुलगी. | कु. सुमती. |

## कीरकोळ पात्रें.

फेरीवाले:—नारळवाला, कुलपीवाला, गंडेरीवाला, पाणीवाला, तान्या ( विरोधकाचा गडी ) शिपाई, प्रेक्षक.

# प्रस्तावना.

श्रीयुत धुमे यांचे हें नाटक कांही पहिलेच नव्हे. श्री. धुमे हे एकाकाळीं अतिशय लोकप्रिय असे नट म्हणून नांवाजले गेले होते. माझ्या बालपणांत त्यांची कामें रंगभूमीवर पाहिल्याची माझी आठवण अजूनही सुस्पष्ट आहे.

मराठी रंगभूमीचे जे निरनिराळे सांप्रदाय अस्तित्वांत आले त्या सर्व सांप्रदायांतून नट या नात्यानें श्री. धुमे यानी प्रवास केला आहे आणि त्यामुळें जुन्यांतल्या जुन्या सांप्रदायापासून अगदीं अलिकडच्या प्रचालित असलेल्या पद्धती पर्यंत नाट्यरचनेचा त्यांना चांगलाच परिचय आहे.

श्री. धुमे यांची पूर्वीची नाटके जरी धंदेवाईक नाटक मंडळ्यांनी केलेली नसली तरी त्याचे स्थानिक मंडळ्यांनी केलेले प्रयोग मुंबईच्या प्रेक्षक वर्गाला परिचित आहेत.

प्रस्तुत नाटकाचें कथानक, समाजांत पदोपदीं आढळून येणाऱ्या एका विशिष्ट प्रसंगावर आधारलेले आहे, असे प्रसंग समाजांत विरळ नाहीत. प्रस्तुत कथानकांतील परिस्थिती नाट्य वस्तूच्या मध्यबिंदूच्या आवातिभोवती जरी स्थानिकतेला धरून लिहिलेली दिसली तरीहि कोणत्याही समाजांत—मग तो उच्च दर्जाचा असो, किंवा कनिष्ट दर्जाचा असो—सर्वत्र दिसून येणारी आहे.

नाट्य वस्तूंतील कांही प्रसंग सकृतदर्शनी अवास्तव वाटण्याचा संभव आहे; पण सत्य हें कल्पनेपेक्षांही विलक्षण असते, याचा प्रत्यय ज्यांना आहे, त्याना या नाटकाच्या कथा वस्तूंत मुळीच अवास्तवता वाटणार नाही.

हिंदू समाजांतील स्त्रीची कायदेशीर अवास्थिती किती बिकट आणि गुलामगिरीचा निदर्शक आहे, याचा कायदेपंडितांना चांगलाच परिचय आहे. सर्व साधारण जनसमाजाला, ती परिस्थिती आकलन होत नाही. प्रत्यहि घडणारे आयुष्यांतील प्रसंग, समाजाच्या इतके अंगवळणी पडून गेले आहेत की यांत कांहीं तरी अवास्तव आहे, कुठें तरी अन्याय होतो आहे; याची

जाणीव समाजांतील घटकाना सहसा होत नाहीं. कायदेपंडितांना ही परिस्थिती कळते, पण कायदेबाजीवरच त्यांचा चरितार्थ असल्यामुळें ही परिस्थिती दूर करण्याचें कार्य ते हातीं घेत नाहीत.

डॉक्टर देशमुखासारखे समाजाच्या रोगाचें निदान करणारे भीषग्वर्यच अशा वेळीं पुढें सरसावतात. आर्यसंस्कृतीचा अवजड डोलारा माथीं वागवतांना समाज कसा चुरडून जातो आहे याचा कोणीच विचार करीत नाही.

अशा एका सामाजिक अन्यायाची बहुजन समाजाला ओळख पटवून देण्यास हे नाटक चांगलेच समर्थ होईल असें मला वाटतें. हे नाटक लिहितांना कर्त्यानें नाट्यरचनेच्या जुन्या तंत्राचाच अवलंब केला आहे. ज्या परंपरेत कर्त्याचें सर्व आयुष्य गेले आहे, त्या परंपरेलाच त्यांनीं अनुसरावें यांत गैर कांहींच नाही. आधुनिक वाङ्मयाच्या कसोटीला हें नाटक लावून पहातांना, तरुण वाचकाला कदाचित समाधान होणार नाहीं, पण समाजांतील एका विशिष्ट अन्यायाचे भीषण स्वरूप समाजापुढे मांडण्यास हे नाटक कार्यक्षम ठरलेलें पाहून आधुनिक तंत्राचा अभिमान बाळगणारा तरूणवाचक किंवा प्रेक्षक देखील क्षणभर संतुष्ट झाल्यावाचून राहणार नाहीं.

सोडलग्नाच्या कायद्याची आवश्यकता प्रतिपादन करणाऱ्या एका विशिष्ट प्रसंगावर आधारलेलें हें नाटक, मुंबईतील जुन्या खानदानी घराण्यांतील प्रपंचा-समोरचे काळे पडदे दूर करण्याचा प्रयत्न करीत आहे, तो प्रयत्न यशस्वी होऊन सोडलग्नाच्या कायद्याची आवश्यकता पुराण्या मनोवृत्तीच्या बुरसलेल्या अंतःकरणावरचा मळ दूर करून जर प्रस्थापित झाली, तर हें नाटक लिहिल्याचें श्रेय लेखकाला मिळालें असें सहज म्हणतां येईल.

ज्या विशिष्ट खानदानी समाजाच्या संसाराचें चित्र या नाटकांत रंगविले आहे, त्या समाजांतील पुराण्या स्त्रियांची विशिष्ट प्रकारची भाषापद्धती मुंबई बाहेरील लोकांनांच नव्हे—तर आधुनिक मुंबईकरांना देखील कदाचित चमत्कारिक वाटेल, पण जुन्या काळाचा ज्यांना परिचय आहे, त्यांना ती भाषा किती वास्तव रीतीनें लिहिलेली आहे याचा सहज प्रत्यय येईल,

प्रचाराच्या दृष्टीनें हें नाटक चांगलेंच परिणामकारक होईल असें मला वाटलें म्हणूनच मी या नाटकाचा हा आधीच परिचित असलेल्या नट आणि नाटककाराचा परिचय वाचक आणि प्रेक्षक वर्गास करून देण्याचें गोडें काम पत्करलें.

हें नाटक परिणामकारक होवो आणि अशाच प्रकारचे सामाजिक अन्याय चव्हाट्यावर आणण्याचे निधडेपणाचे कार्य करण्याची उत्तेजना श्री. धुमे यांना मिळून, रंगभूमीवर अशीच प्रचारात्मक नाटकें लिहून आणण्याची त्यांना बुद्धी होवो अशी इच्छा प्रदर्शित करून मी रंगसज्जेकडे प्रेक्षकांचें अवधान खेचण्यासाठीं येथेंच विराम करतों.

हाजी कासमवाडी,
मुंबई, १३-१-३९ } **भार्गवराम विठ्ठल वरेरकर,** (मामा)

---

# ' कान-मंत्र. '

" कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा वाढत नसते " म्हणतात तें कांहिं खोटें नव्हे. माझ्या नाटकांतील कथानकाचा बराच उदोउदो होऊन कांहिं भेकड वृत्तीच्या माणसांना त्याचा मोठा बाऊ वाटला व त्यामुळें माझ्या या नाटकाचा भाव वाढला असेंच मला म्हणावें लागतें.

शीलवंत आर्य स्त्री वाटेल त्या हाल‌अपेष्टा सहन करील परंतु नादान पतीचे अर्धांगिपद कोणत्याही परिस्थितींत स्विकारणार नाहीं. अशा एका विशिष्ट प्रकारच्या लग्नासारख्या महत्वाच्या प्रश्नावर बोधप्रद प्रकाश पडावा, आणि पांढरपेशा समाजाला या नाटकावरून योग्य तो बोध घेतां यावा याच उद्देशानें मी हें नाटक लिहिलें आहे. करितां ही माझी वेडीवाकडी नाट्यकृति माझे प्रेमळ बंधुभगिनी हंसक्षीर न्यायानें गुणग्राह्य करतील अशी मी आशा करतो.

लग्नाच्या वेळच्या गंभीर शपथा मोडून स्वैरवर्तनानें केवळ नामधारी नवरेपणा गाजवून स्वतःच्या गृहिणीस घराबाहेर घालविल्यास त्या बिचाऱ्या भोळ्याभाबड्या सौभाग्यवतीने पति जिवंत असतांहि वैधव्य भोगावे हें आमच्या हिंदु समाजास रुचतें तरी कसें याचेंच नवल वाटतें.

माझ्या नाटकाची प्रस्तावना महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साहित्तिक व सर्वांचे परिचित श्री. मामासाहेब वरेरकर यांनी आपला अमोल्य वेळ खर्चून व माझ्या विनतिस मान देवून गोड शब्दांनीं लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा आजन्म ऋणी आहे.

श्री भारत नाट्य मंडळ या उत्साही संस्थेनें व मंडळाचे डायरेक्टर श्री. पां. ल. देशपांडे यांनी आपलेपणा बाळगून हे नाटक बसविले, मंडळातील हार्मोनियम मास्तर श्री. शांताराम परब यांनीं प्रसंगाला योग्य अशा पदांच्या गोड चाली दिल्या. तसेच येथील सुप्रसिद्ध "रेक्स फोटो स्टुडिओ" चे मालक रा. अनंतराव राजाध्यक्ष यांनी अत्यंत परिश्रमानें नाटकांतील फोटो काढुन दिले व क्षणाचाही विलंब न लावतां माझे स्नेही रा. रेळे यांनी डी. डी. नेराय कंपनी करवी अप्रतीम ब्लॉक करून दिले त्याबद्दल सर्वांचा मी अत्यंत आभारी आहे.

माझे हितचिंतक स्नेही श्री. माधवराव कामत यांनी मला हरएक प्रकारें वेळोवेळी साह्य केलें तरी त्यांचे आभार मानणे अस्थानी होणार नाहीं.

जो दुसऱ्यावरी विश्वासला त्याचा कार्यभाग बुडाला या अन्योक्तीनुरुप या पुस्तकाच्या छपाईच्या कामी कांही ठिकाणी अनपेक्षित चुका झालेल्या आहेत व त्याबद्दल मी दिलगीर आहे.

शेवटी कुलदैवत कृपाप्रसादें ही माझी नवनाट्यकृति जनताजनार्दनाच्या सेवे-करितां सादर करीत आहे, ती रसिक गुणीजनांनीं मान्य करून घ्यावी अशी प्रेमळ विनंती करून हा कान-मंत्र येथेच संपवितो.

सर्वांचा कृपाभिलाषी,

**केशरीनाथ सितारान धुमे.**

लॅमिंग्टन रोड, मुंबई.

*

## श्री. केसरीनाथ सिताराम धुमे.



संगीत जुलमी सत्ता, द्वाड शहाणी, कुमारी संभव,
नरडीचा घोट, उडाणटप्पू, गेलीविचारी,
इत्यादि नाटकांचे कर्ते.

॥ श्री मंगेश प्रसन्न ॥

# संगीत
# " वाहवारे जांवई ! "

## अंक १ ला.

**प्रवेश १ ला.** स्थळ--भोलानाथचें घर.

( भोलानाथ विचारांत बसले आहेत, भाई वर्तमानपत्र वाचीत बसले आहेत व भोलानाथच्या खुर्चीमागें प्रभा उभी आहे असा देखावा. )

" ईश स्तवन "

**पद १ लें.**

**आऽऽऽश्‍री मांगिरीष । कृपावंत जगनीवास ।**
**शेषभूषण उमाकांत । नंदी वाहन श्रीनटेश ॥ आ ॥**
**नाट्यरूपें सत्यकथन । अल्प मतें रचुनी सुमन ।**
**अर्पीत पदपंकजीं तव । दे शूभवर केशवास ॥ १ ॥**

**प्रभा**—बाबा, हे हो काय असं ! जेव्हां पाहावं तेव्हां तुम्ही आपले सारखे विचारांत. माझी आई वारल्यापासून तुह्मी नाना प्रकारें माझे लाड पुरविलेत, आईची आठवण सुद्धां होऊं दिली नाही मला, मग तुम्हाला असे चिंताक्रांत बसलेले पाहून माझ्या मनाची स्थिती काय बरं होत असेल बाबा ? ( थांबून ) समजलं येवुन जाऊन माझ्या लग्नाचिच चिंता वाटते ना तुम्हाला ? पण मी म्हणते, अशी चिंता करून तरी काय उपयोग. ताईच्या लग्नाची तुम्ही अशीच विवंचना करीत होता. पण योगायोग आल्याबरोबर आला ना नवरा चालत घरीं ? झालं ना सारं तुमच्या मनाजोगतं ! बोला, बाबा बोला, विचार कसला करतां ! बोलाना !

**भोलानाथ**—( प्रभेकडे वळून ) प्रभे, किती बोलशील, किती बडबडशील अग तुझ्या बोलण्याला कांहीं सुमार ! नको म्हटलं म्हणून विचार यायचे राहतात

का मनांत. उपवर मुली म्हणजे त्यांच्या पालकांच्या हृदयाशी बिलगू पहाणाऱ्या दूधारी कट्यारीच होत. तुझ्या ताईचं लग्न केलं, तिच्या दैवानं तिला मनाजोगता उत्तम नवरा मिळाला, एकलकोंडा कां असेना ! पण—

**प्रभा—**( मधेंच ) पण काय बाबा ! हं, आलं माझ्या ध्यानांत, मुलीला मुंबईकर नवरा मिळावा अशी आपली मनापासून इच्छा होती. पण ताईला मिळाला कोंकण्या ! आणि म्हणूनच तुमच्या मनाला वाईट वाटतं. होयना ? असे ना; कोंकण्या तर कोंकण्या. बायकोला सुखासमाधानानं व मायेममतेनं वागविणारा असला की झालं. त्यांतून—

**पद २ रें.**

**ललना भूषणा गणिती । निजपति यश गुण ।**
**जगिं अभिनव, आभरणची जीवना । ग. ।**
**रमण रमणिवरी, देहि भिन्नता ।**
**एक जीव हृदयीं मिलनी त्या. ॥ ल० ॥ १ ॥**

नसं पाहिलं तर मुंबईकरावर ताण केली आहे बरं आमच्या भाऊजीनं, माझ्या ताईला आज काय कमी आहे. घरांत नोकर चाकर आणि हिंडण्या फिरण्याला मोटार, तऱ्हतऱ्हेचीं पातळं, ब्लाउजेस, सेट्स या तिच्या सुखाचा व वैभवाचा हेवा. आपलीच माणसं करतात ना बाबा.

**भाई—**( स्मित हास्यानें ) अगदीं बरोबर बोललीस प्रभे. भोलानाथ, तुमची प्रभा मोठी धूर्त व समंजस मुलगी आहे बुवा. हिचे हे बोल, जणुं काय सुवर्ण मोलच वाटतात मला. भोलानाथ, कोंकण्या व मुंबईकर यांत भेद कोणता ? सर्व कांहीं आपल्या वागणुकीवर अवलंबून असतं.

**भोलानाथ—**भाई, खरं आहे तुझं म्हणणं. प्राक्तनापुढं कोणाचाच इलाज नाहीं. काय सांगू भाई, माझ्या वडील मुलीचं दैवच खोटं म्हणून हे असं—

**भाई—**(मध्येंच) असं म्हणजे कसं ! भोलानाथ, तुमच्या वडील मुलीला मायेममतेनं वागविणारा हौशी व चांगला हुद्देदार नवरा मिळाला, इतकंच नव्हे तर तुमच्यावरही त्याचं निःसीम प्रेम.

**भोलानाथ—**( स्मित हास्यानें ) प्रेम. भाई अरे वत्सलं प्रेम. ही माया ममता उसनी बेगडी आहे बरं बेगडी. कृतीनं पाहावं तर साराच ठणठणपाळ. किती झालं तरी कोंकण्या तो कोंकण्याच. अरे जांवई म्हणजे “ जा ” अधिक “ वई, ” जा म्हणजे जाणारा, आणि वई म्हणजे हद्द ! ज्यानें आपल्या कर्तव्याची हद्द सोडली, तो कसला जांवई ! “ वाहवा रे जांवई ” अशा जांवयांची अंतःकरणं सरळ कशी असणार ! यांचे दाखवायचे दांत निराळे, आणि खावयाचे निराळे.

**भाई—**ते कांहीं म्हणा, पण तुमचा जांवई किनई थरो जंटलमन. त्याची वागणूक व स्वभाव मला तर सरळ दिसतात. मग ‘ अंदरकी बात राम जाने ’ किंचित् पोरबुद्धि असल्यामुळं, केव्हां केव्हां मात्र वात्रटपणा करतो.

**भोलानाथ—**( मान हालवून ) हो. स्वभावानं उत्तम, पण त्याच्या त्या उडाणटप्पू मित्रांच्या संगतीनं तो स्वतःची पोझिशन् घालवितो. परक्यांच्या तंत्रानें वागणारीं माणसं शिंगा–शेपटीचीच असतात. अशानी जर स्वमतानं वागण्याचा प्रयत्न केला तर त्यांची किंमत जगाच्या बाजारांत कवडी मोल ठरते. ( प्रभेस ) प्रभे, दोन कप चहा तयार कर पाहूं. जा. ( प्रभा जाते. )

**भाई—**( प्रभा गेल्यावर नीट पाहून ) भोलानाथ, मला येवून बराच वेळ झाला. ज्या कामाकरितां मी आलों, ते राहिलं बाजूला, आणि तुम्ही आपल्या जांवयाचंच पारायण सुरू केलत.

**भोलानाथ—**अरे हो, तूं मघा कांहींसं पुटपुटलास खरं. माझं लक्षच नव्हतं बोल बोल काय काम होतं ते.

**भाई—**( इकडे तिकडे पाहून) काम कांही विशेष नव्हतं. आपल्या प्रभेच्या लग्नासंबंधी मला कांहीं बोलायचं होतं.

**भोलानाथ—**( आनंदानें मांडीवर मांडी चढवित ) काय, काय, माझ्या प्रभेच्या लग्नासंबंधी ? खरंच कीं काय भाई ? ( मांडी ऊडवित ) सांग सांग तर मग काय सांगायचं ते. प्रभा, इथं येण्यापूर्वी सांग हो. पण थांब. इथं यायला तिला विलंब लागावा म्हणून एक युक्ति करून येतो. ( ऊठतो. )

**भाई**—( विस्मयानें ) युक्ति ? युक्ति ती कसली बुवा ?

**भोलानाथ**—अरे कांहीं तरी खाद्य करायला सांगतो, म्हणजे तितकाच इथं यायला तिला विलंब होईल. ( जाऊं लागतो तोंच मागें वळून ) अरे पण हो, तुला काय आवडतं तें सांग पाहूं, शकरपाळे किं तिखट रवा, त्याप्रमाणं प्रभेला सांगून येतों. नंतर आपण स्वस्थपणी बोलूं.

**भाई**—कशाला बिचारीला विनाकारण त्रास.

**भोलानाथ**—त्रा, त्रास कसला. चहाबरोबर कांहीं खाद्य नको का ?

**भाई**—तर मग असं करा. ते शंकरपाळे आणि तिखट रवा नको. ( डोकें खाजवित ) तिला हें करायला सांगा. काय बरं तें.

**भोलानाथ**—( स्मित हास्यानें ) अरे हें काय, आणि तें काय ? त्याला कांहीं नांव आहे किंवा नाहीं.

**भाई**—हो, आठवलं. बटाटी पोहे. ( मिटक्या मारतो. )

**भोलानाथ**—हात् तिच्या. एवढंच ना ? ठीक, तर मग तेच करायला तिला सांगुन येतो. ( जातो. )

**भाई**—( स्वगत ) किती सरळ आणि साधा माणूस आहे हा. बिचारा अगदीं भोळा. भोलानाथ, हें नांव शोभतं याला. चार वर्षामागं याचं कुटुंब निवर्तल्यामुळं याची दुर्दशा झाली, याला दोनच मुली, थोरल्या मुलीचं लग्न झालं, आतां ही मुलगी उपवर झाल्यामुळं हिच्या लग्नाच्या चिंतेनं, रात्रंदिवस बिचारा झुरणीस लागला आहे. ( पडद्याकडे पाहून ) आलाच.

**भोलानाथ**—( प्र. क. ) तुझे बटाटे पोहे करायला प्रभेला सांगुन आलों बुवा. आतां इथं यायला तिला बराच विलंब लागेल. (मांडी घालून) बरं, सांग पाहूं आतां काय सांगणार होतास तें ! पाहिला आहेस कां कुणी नवरेदेव ? ( मान हालवून ) हो. तूं मनांत आणलंस, तर आडत्रा हत्ती उभा करशील. त्यांतून तुझं आमचं रक्त एकच. तेव्हां साहजिकच तुला तिची कळकळ येणार.

**भाई**—प्रभेला, मुंबईकराला आणि कुटुंबांत द्यायची, असं वारंवार आपण सांगत होतांना मला ! तेव्हां तुमच्या मनाजोगतं, एक उत्तम स्थळ मी पाहिलं आहे.

**भोलानाथ**—( आनंदानें ) खरच की काय भाई ! ऑं. खरंच !

**भाई**—खरंच. ते स्थळ तुमच्या प्रभेला अगदी योग्य आहे. बरं स्वतःच्या पसंतिनुरूप नवरा मिळावा, अशा आधुनिक मुली प्रमाणं तुमची प्रभा नाही, तुम्हाला जे इष्ट तेंच तिला इष्ट.

**भोलानाथ**—हो. तें खरं भाई. आजकालच्या चत्रचाल पोरीप्रमाणं माझ्या प्रभेचं वर्तन नाही. तिला किनइ किंचित् धोरण कमी. तेव्हां तिच्या स्वभावाला पोषक अस एखादं सात्विक, पण कुटुंबवत्सल घराणं लाभावं, हीच माझी इच्छा. पुढं श्रीची मर्जी. बरं भाई, सांग पाहूं तूं योजलेलं स्थळ तसंच आहे का ?

**भाई**—हो, आहे. तसंच आहे माझ्या ऑफिसांत एक तरुण आहे. वयानं पचविशी या पुढं, आणि तिसीच्या आंत. प्रथम वर, गौर वर्णी, निर्व्यसनी हौशी, तरतरीत, कुटुंबवत्सल आणि मुंबईकर !

[ मधुन मधुन भोलानाथ आनंदानें ऑ. ऑ. असें करतो ]

तेव्हां त्याच्यावर माझा डोळा आहे.

**भोलानाथ**—( आनंदानें ) माझ्या प्रभेला जर का असा नवरा मिळाला, तर तिच्या संसार जीवनाची नौका, भावी आयुष्याचा भव्य सागर ओलांडून सुखानं पैलतिरी जाईल, असा मला आत्मविश्वास वाटतो तरी पण उभयतांची पत्रिका जमली पाहिजे. नाहीतर साराच खेळखंडोबा व्हायचा. नंतर हुंडा !!

**भाई**—पत्रिका ! अहो कसली पहाता पत्रिका ! या नव्या काळांत पत्रिकेला कोणीच महत्व देत नाहिंत. सर्व थोतांड आहे. आतां, हुंड्या विषयी म्हणाल तर तुमच्या आटोक्याबाहेर जाईल, असं मुळीच होऊ देणार नाही. हें पहा भोलानाथ मी असं करतों.

**भोलानाथ**— ( उत्कंठेने ) कसं करतोस !

**भाई**—कांही तरी निमित्तानं त्याला इथं घेवून येतो; म्हणजे तो प्रभेला पाहिल. माझी पूर्ण खात्री आहे की, आपली प्रभा, त्याला पसंत पडलीच पाहिजे. अहो या जन्माच्या गाठी आहेत भोलानाथ !

**भोलानाथ**—माझी प्रभा कुटुंबात पडून तिला जर सौख्य होणार, तर मग हुंड्याविषयी मला पर्वा नाही. अरे हजार पांचशे अलिकडं पलिकडं. तरी पण कुलस्वामीचा प्रसाद आणि पत्रिका—

**भाई**— ( मध्येंच ) पुन्हां पत्रिका ! भोलानाथ, अहो या पत्रिकांची ढाल पुढं केली कीं मुलीला लग्नाचं वर लागणं कठीण करणाऱ्या आल्या आहेत हो, पत्रिका, आणि कुंडल्या ! जिथं नुसत्या नजरानजरे या कुंडल्यानं, चंद्रप्रकाशाच्या संसाराचं नंदन वन तयार होतं. तिथं तुमच्या त्या कागदी सुरळ्याच्या पत्रिकेला विचारतो कोण? तुमची तयारी असेल, तर उद्यांच त्याला एकांती गाठून काय ते विचरतो. अहो त्याच्या घरचं कुटुंब ( भोलानाथ चपापतो ) कां ? असें चापापलांत कां ? कुटुंब ह्मणजे बायको असाच कांही अर्थ होत नाही. कुटुंब ह्मणजे, आई, बहीण, भाऊ, भावजय वगैरे वगैरे, चांगल्या आणि कुलीन अशा घराण्यांत तुमची प्रभा चमकेल बरं ! आहांत कुठं ! भो-ला-नाथ !

**भोलानाथ**—( आनंदानें चुटकी वाजवित ) तर मग भाई, अशी सुवर्ण संधी दवडूं नकोस बाबा, माझ्या प्रभेचं लग्न झालं, कीं मी मोठ्या घोरांतून मुक्त होईन.

[ इतक्यांत चहाचे प्याले व खाद्याच्या बशा प्रभा टेबलावर आणून ठेवते. ]

आले बुवा, तुझे गरमागरम बटाटी पोहे. चालुं दे पाहुं आतां.

( भाई व भोलानाथ खाद्य सुरू करतात व चहा पितात. )

**भाई**—( जीभ चाटीत ) वाः किती लज्जतदार हे बटाटी पोहे तरी.

**भोलानाथ**–तर मग खावें पोटभरी, आणि घ्यावें वरचेवरी ! [दोघे हंसतात]

**भाई**—( उठून ) बरं, भोलानाथ, येऊं मी आतां ?

**भोलानाथ**—निघालास, बरं पण लक्षांत आहेना !

**भाई**—त्याची काळजी नको. मनांत आरंभलेलं कार्य यशस्वी करणं हा तर माझा हातखंडा !

**भोलानाथ**—काम फत्ते कर ह्मणजे झालं.

[ पडदा पडतो. ]

———— ————

## प्रवेश २ रा.

[स्थळ—चौपाटी. इकडून तिकडे लोक सहल करीत आहेत. नारळवाला, गंडेरीवाला, पाणीवाला, कुलपी मलईवाला वगैरे फेरीवाल्यांच्या फेऱ्या चालत्या आहेत असा देखावा.)

कुलपीवाला—कुलपी मलाई, पीस्तानी, बदामनी, केसरनी कुलपीमलाऽऽई.

भट—पॉनी, थंडा पॉनी, मिठ्ठा पॉनी, चले आव, एक पैसा, थंडा पॉनी.

गंडेरीवाला—ये शेगा गंडयेरीऽऽऽ लय ग्वाड, लय ग्वाड, गंडयेरी.

नारळवाला—नारयेल, कवला नारयेल, पानीवाला नारयेल, अलिबागका नारयेल, चले आव, मिठ्ठा पानी, लय तंडा, लय तंडा.

( इतक्यांत कामेश्वरासह सुलु रडत रडत प्रवेश करते. )

सुलु—( डोळे चोळीत ) पुंः वुंः पुंः वुंः ! !

कामेश्वर—[ त्रासानें ] अग पण गप्प रहा. तूं वेडी का आहेस हट्ट करायला. लोक सारे हांसतील ना सुले.

सुलु—( रडव्या सुरांत ) उंः उंः उंः मी नाय जा. मी नाय जा. माला कुलपी नायतल नालल पायजे. उंः उंः उंः मीनाय जा. उंः उंः उंः.

कामेश्वर—( चिडून ) तूं गप राहतेस को नाहीं. लहान पोरं पाहिलीं कीं या फेरिवाल्यांना ऊत येतो.

सुलु—[ रडव्या स्वरांत ] उंः उंः उंः. काका कुलपी, ऊं. ऊं. ऊं. काका गंडेली, उंः उंः उंः. काका नालल.

कामेश्वर—( अतिशय चिडून ) छे, छे, छे, छे, सुले, अग तूं फारच हट्ट करायला लागलीस. अशानं पुन्हां तुला कधिंहि चौपाटीवर आणायचा नाहीं. [ बोट दाखवून ] ती पहा. ती पहा, तिथं बसलेली मुलं, तुझ्यापेक्षां कितितरी लहान आहेत, पण ती करतात कां हट्ट ? नाहींतर तूं. [ वेंडावुन ] माला हे पायजे, नी ते पायजे. मूर्ख कुठली.

[ सुलु डोळे चोळीत मोठ्यानें रडूं लागते व थबकन रेतीवर बसते, लगेच कामेश्वर तिला उठवितो व अंगावरील रेती झाडतो.

**कामेश्वर**—( रागानें ) शीः शीः शीः अग काय हें सुले ! रेती लागली ना तुझ्या फ्राकला ! चूप रहा. साऱ्या लोकांसमोर भोकांड काय पसरतेस. ( पुन्हा: पाठ झाडतो. ) शीः शीः शीः ( सुलु स्फुंदत रडूं लागते ) अग पण तुला काय पाहिजे तें बोलना एकदां. उगाच बोंबलतेस कशाला ?

**सुलु**— ( हुंदके देत ) म–म–मला, ना–ना–नालातल पा-पा-पानी पायजे ऊं, ऊं, ऊं,

**नारळवाला**—( प्र. क. ) नारियेल, पानी वाला नारयेल. लय मिट्ठा लय तंडा, लय तंडा नारयेल

**कामेश्वर**—ये नारळवाला, ये नारेल, ये नारेल.

**नारळवाला**—आया आया साब. लौकर ( लौकर येवून नारळाची पाटी कामेश्वराच्या पुढ्यांत ठेवतो ) लेव साब लय तंडा पानी है. कवळा आलिवागका नारेल है कितना होना साब,

**कामेश्वर**—( दमात ) अरे कितना कितना क्या करता है. एक होना. अच्छा पानीवाला होना, अच्छा होयगा, तो पैसा मिलेगा, समजा. कैसा दिया बोलो.

**नारळवाला**—[ तोंड वेडवांकड करून ] छ देडया सेट.

**कामेश्वर**—क्या, छ देडया ? अरे चार पैसेकू मिलता, और तुम बोलता छ पैसा !

**नारळवाला**—[ गयावया करून ] नई सेट चार पैसा नय, छ पैसा सेट.

**कामेश्वर**—[ खिशांत हात घालीत ] अच्छा देव एक.

( नारळवाला नारळ तासुन फोडून कामेश्वराच्या हातांत देतो. कामेश्वर त्याला पैसे देतो. नारळवाला निघून जातो )

[ कामेश्वर नारळांतील पाणी सुलुस पाजतो व पिता पिता सुलुच्या फ्राकवर नारळांतील पाणी पडतें. कामेश्वर चिडतो. ]

**कामेश्वर**—अग पण नीट पी. छे, छे, छे. काय हे सुले. अग, तुला पाणीसुद्धां नीट प्यायला येत नाही ना ! फ्राक भिजला ना तुझा. चल गाढव कुठली. थांब. घरीं चल. तुझ्या आईला सांगुन चांगले बरं चिमटे काढायला लावतों चल

**सुलु—**( कौतुकाने ) नाय जा. माला आई नाय मालायची. तुमालाच मालेल. पलवा लातली आइनं, कचे तुमच्या गालाला चिमते काल्ले ! अँ, मी हलुच बघितलं, अँ. !

**कामेश्वर—**( पडद्याकडे पाहून) चूप. गप्प बैस, ते पहा भाईमामा इकडच येत आहेत. त्यांनीं ऐकलं तर ते तुला खुळी म्हणतील.

**भाई—**( प्र. क. ) भले बहाद्दर, कामेश्वरपंत, कमाल केलीत बुवा, खरंच आह्मां हिंदु लोकांना, नियमितपणा, का तो मुळीच ठाऊक नसतो तो जर आमच्या अंगी असता, तर महात्माजींना स्वराज्य प्राप्तीला कालावधी मुळींच लागला नसता.

**कामेश्वर—** ( हांसत ) काय; झालं काय भाई ?

**भाई—** होणार काय कपाळ ! चौपाटीवर टिळकांच्या पुतळ्याच्या बाजुला बसतो असं तुह्मी मला सांगितलं. इथं येवून टिळकांच्या पुतळ्याला सहस्त्र प्रदक्षिणा घातल्या. इकडं पहा तिकडं पहा. सर्व ठिकाणीं पाहिलं. पण छट् स्वारीचा कुठंच पत्ता लागेना. बरं, त्या पुतळ्यापाशीं, मुंग्यासारखा बायकांचा घोळका ! त्या लागल्या बघायला टकमक टकमक माझ्याकडं ! मला कसंसच वाटं लागलं.

**कामेश्वर—**[ हांसत ] काय ! बायकांनी तुमच्या तोंडाकडे पाहिलं तेव्हां तुम्हाला कससंच वाटं लागलं होय ! ठीक.

**भाई—**तर हो काय, त्या बायकांना वाटलं असेल कीं, हा कोणीतरी रंगेल आपल्या रमणीला शोधित असावा, हो. कारण कांहीं चटकचांदण्या आपल्या प्रियकरांना दर्शन देण्याकरितां त्या ठिकाणीं जमत असतात. काय त्या बायकांचा थाट ! कित्येकानं मैल दीड मैल केंसाच्या वेण्या पाठीवर सोडलेल्या, तर कित्येकानीं मेम साहेबासारखे बॉबकट केलेले, कित्येकानीं तर चार चार गंगावन बिटक्या बुचड्यांत गुंडाळून हें भल भक्कम बोचकं मानेवर ठेवलेलं. सारं हिंदुस्थान दिसेल, अशी त्यांची ती झिरझिरीत तलम पातळं. ते अर्धवट ब्लाऊझ. तो नखरा, ती डोळ्याची चमक, खरंच कामेश्वर, तो बायकांचा तांडा पाहिल्या बरोबर मला काय वाटलं आणि काय झालं तें काय सांगु. (सुस्कारा सोडतो.)

**कामेश्वर—**[ हंसत ] मग बघायची होती एखादी फटाकडी.

**भाई—**[ कोपरापासून हात जोडुन ] नकोरे बुवा, आपल्याला ती फटाकडी. माझ्या प्रथम पत्नीच्या निधनानंतर चौदा वर्षांनी एका फटाकडीशीं मी लग्न केलं. पण काय ! ओम फस, तिनं माझ्यापाशीं कसं बसं वर्ष काढलं म्हणा आणि शेवटी माझं होतं नव्हतं, तें सर्व लुबाडुन आणि मला यथेच्छ बडवून माहेरी कि हो चालती झाली. आज सतत तीन वर्षे मी कडकडीत ब्रम्हचारी आहे बघा ब्रम्हचारी ! !

**कामेश्वर—**कशाला कडकडीत ब्रम्हचारी राहिलात ! अहो एक गेली तर दुसरी, बायकांला हो काय तोटा, तुमची तयारीच पाहिजे.

**भाई—**काय; माझी तयारी नाहीं ? भले. अहो. ( खिशांतून कागद काढतो ) एक नव्हे दोन नव्हे तर एकोणीस मुलींच्या नावाचं लीस्ट आहे माझ्या खिशांत ! हें बघा. [ कामेश्वरास कागद देतो ] पाहिलंत. त्यांतली पसंत कुठली करायची त्याचाच विचार करित असतो मी.

**कामेश्वर—**[ कागद पाहुन ] अबबबब ! आहे खरं बुवा एकोणीस मुलींच्या नावाच लीस्ट. पण कायहो, भाई, या साऱ्या कुमारीकाच ना ? कीं आपलं—

**भाई—**वाः शाबास, कामेश्वरपंत, माझी थट्टा करतां होय ! अहो माझ्या वयाकडं जरा बघा, खुप· खुप आहांत बुवा.

**कामेश्वर—**तर मग करा एखादी यांतली पसंत, आणि द्या उडवून बार न काय. [ लिस्ट देतो ]

**भाई—**प्रथम तुमची चंद्रज्योत उजळु द्या; नंतर आमची. बरं ते जाउं द्या. सदरपाशी बोललांत का यासंबंधी ?

**कामेश्वर—**छट् ऑफिसांत झालेल्या आपल्या गोष्टी पैकी, एक अवाक्षर सुद्धां मी काढलं नाहीं कुणापाशी. कारण मुलगी पसंत पडली तर ठीक. नाहिंतर मुदपाक खान्यांत जाऊन उपाशी राहाण्याची पाळी यायची.

**भाई—**बरोबर. मी तुम्हाला स्पष्ट सांगतों, ती मुलगी चांदणी तेजानं अलंकृत आहे परंतु तीच्या भोंवताली रूपेरी गालीच्या मात्र पसरलेला नाहीं.

**कामेश्वर—**हो. पण तिचा बाप चांगला गब्बर आहे म्हणे.

**भाई**—सांगतो कोण ? निव्वळ तुमच्या भाषेंत बोलायचं म्हणजे दिसतं तसं नसतं आणि म्हणूनच तुमच्यासारखं अर्धवट जग फसतं. कामेश्वरपंत अहो संसारचक्रावर एकदां का आपण विराजमान झालांत, कीं मग तें कस कसं फिरवील तें आपोआप कळेल.

**कामे०**—बरं तर मग, कधी चलता भोलानाथाच्या घरी ?

**भाई**—कधी काय ! चला याच पावली. मी तयार आहे. हो. शुभस्य शीघ्रं असलीं कामं रेंगाळत ठेवणं बरं नव्हे. डिले इझ डेंजर !

**कामे०**—पण ही सुलु बरोबर आहे ना ?

**भाई**—असेना तिला काय कळतं गुडमनचं एक चॉकलेट दिलं की झालं. ती कशाला बोलणार घरी. यायचं असेल तर चला. नाहीतर दुसरी अपॉइन्टमेन्ट करूं.

**कामे०**—छे, छे, आत्तांच जाऊंया, कारण आपल्या अवचित आगमनाची कल्पना भोलानाथाला नसणार, तेव्हां आपण आकस्मिक गेलेलं बरं. पहावयास येणाऱ्या नवरदेवाच्या नजरेत आपली मुलगी चटकन भरावी म्हणून प्रत्येक आई बाप मुलीला नटवून सजवून ठेवीत असतात. अशी पुरातन रूढी आपल्या समाजांत चालू आहे. अशामुळं ती मुलगी बहुल्याची पायरी चढतांच दुःखाची एकएक पायरी चढून त्याचं शिखर गाठते. आणि शेवटी तिच्या आयुष्याची इतिश्री होते. तेव्हां निदान मी तरी या रुढीच्या विरुद्ध आहे.

**भाई**—समजलो. समजलो. एकुण तुमच्या भावी कुटुंबाला स्वाभाविक सौंदर्यात पाहण्याची तुमची इच्छा आहे. ठीक. बरं मुलगी पसंत पडली, तर मग माझ्या अटी कबूल करालना ? बोला.

**कामे०**—ओ एस. तुमच्या शद्बाबाहेर मी मुळीच जाणार नाहीं.

**भाई**—पण काय हो. कामेश्वरपंत. तुम्ही मातोश्रींचे आज्ञाधारक म्हणवितां मग माझा शब्द कसा पाळाल.

**कामेश्वर**—लग्न व्हायचं माझं. आईचं नव्हे. तेव्हां सारासार विचारानं जबाबदारी माझी मीच शिरावर घेणार, ते ओझं दुसऱ्या कुणालाहि घेण्याचं कारण नाही. चला तर आतांच भोलानाथच्या घरी, तिथुन लौकरच निघूं वहिनी वाट पाहतील, कारण सुलू बरोबर आहे.

**भाई**—चला. [ जातात ]

## प्रवेश ३ रा.

**स्थळ—**भोलानाथाचें घर.

( भोलानाथ ऑफिसांतून येऊन आराम-खुर्चीवर पडले आहेत.
वेळ रात्री पावणेंसातची. पडदा उघडतो. )

**भोलानाथ—**प्रभे ! ये प्रभे.

( आंतून " ओ आलें बाबा " असा ध्वनी येतो )

अम्मळ बाहेर ये पाहूं.

केस विसकटलेले, मलीन पातळ नेसलेली, हातांत लाटणें असलेली अशी ओंचा खोचित प्रभा बाहेर येते. )

पोळ्या लाटीत होतीस का ?

**प्रभा—**हो बाबा. आज सोमवार ना ! तेव्हां मुगाची डाळ, वायंग्यांची भजी, आणि चटणी झाली, फक्त पोळया राहिल्या आहेत, त्या झाल्या कीं तुम्हांला वाढते. कां भूक लागली बाबा ?

**भोलानाथ—**छे, छे, त्यासाठीं हांक मारली नाहीं. भाई किंवा कोण इथं आलं होत का ?

**प्रभा—**नाहीं. कोणी नाहीं. यायचे होते भाई ?

**भोलानाथ—**हो.

**प्रभा—**थोडा चहा आणूं बाबा.

**भोलानाथ—**नको. चहा घेतला तर जेवण चालणार नाहीं. हें चहाचं बंड, आमच्या घरांत फार माजलं आहे, मला आतां महात्मा गांधीचं व्रत पाळलं पाहिजे, त्याशिवाय या चवचाल चहाची खोड मोडायची नाहीं.

[ इतक्यांत दारावर थाप ऐकूं येते. ]

( उठून ) कोण आहे. ( दार उघडतो. )

[ भाईसह कामेश्वर व सुलु प्रवेश करतात ]

[ प्रभा आंत जाते. ]

**भोलानाथ—**( स्मित हास्यानें ) या भाई या बसा. ( कामेश्वरास ) बसा मीस्टर. ( सर्व बसतात. )

**भाई**—बरोबर सहाला चर्निगेडच्या बागेत येतो; असा तुम्ही मला फोन केलात बागेत मी हिंड हिंडलों, तुमचा पत्ताच नाहीं विसरलांत वाटतं ! ठीकच आहे. वयमानाप्रमाणं स्मरणशक्ति कमी व्हायची. हॅः हॅः ! !

**भोलानाथ**—भाई, मी हा आत्तां आलों. काय सांगु तुला, अरे आमचं ऑफिस कांहीं सरकारी नव्हे, की पांचाच्या ठोक्याला सुटली शाळा आमचं ऑफिस म्हणजे कारकूनांचे प्राण भरडून काढण्याची नुसती गिरण आहे गिरण ! वांद्र्याच्या कसाई खान्यांत, मुक्या जनावरांना भरडून काढतात तर आमच्या इथं चालत्या बोलत्या व गुलाम बनलेल्या कारकूनाना भरडतात. त्यांतून हा डिसेंबर महिना आला की मग विचारूंच नका. आमच्या कामाच्या पाण्याचं आधण उकळूं लागत. नशीब एवढंच की ऑफिसचा टाईम चोव्वीस तासाचा केला नाहीं, तोहि केला असता, पण सूर्यनारायणाला आमची दया येवून, त्यानी छत्तिस तासाचा दिवस केला नाही. खरंच भाई, या नोकरी पायीं मी अगदी हैराण झालों आहे. एकदां या पोरीच्या ऋणांतुन मुक्त झालों की, नंतर संसार निवृत्त संन्यास घ्यायला मोकळा झालों.

**भाई**—[ मोठ्यानें हांसून ] काय म्हणतां भोलानाथ ! संन्यास ? आणि तो तुम्ही घेणार ? अहो पण तुम्ही संन्यास घेतल्यावर त्या गोव्यांतील मंगेश कारांना फाल्गुनराव शोधायला जायचं कुठं ? ( पुन्हां हासतो. )

**भोलानाथ**-हांस हांस तुला सारी थट्टाच वाटते, पण मी मनापासून बोलतो.

**भाई**—बरं ते जाऊं द्या [कामेश्वरास पहाण्याकरितां भोलानाथास खूण करीतो ] परवां मी सांगितलं होतं.

**भोलानाथ**—( कामेश्वरास निरखून पाहून) यांना कुठं तरी पाहिल्यासारखं वाटतं कुठं आणि केव्हां, तेवढं बरीक आठवत नाहीं.

**कामेश्वर**—मी सांगतों, कांहीं वर्षांमागं, तुमच्या ऑफिसांत होतो मी.

**भोलानाथ**—[ विचार करून ] आयसी राईट. आलं माझ्या ध्यानांत. [ पडद्याकडे पाहून ] प्रभे, चहा आण पाहूं.

[ प्रथम दोन व नंतर दोन असे चहाचे प्याले प्रभा टेबलावर आणून ठेवते. प्रभेस पहाण्याकरितां कामेश्वरास भाई खूण करतो. प्रभा जाते.]

**भोलानाथ**—घ्या महाराज. ( सर्व चहा पितात. )

**भाई**—( रुमालानें तोंड पुसीत ) हे माझ्याच ऑफिसांत आहेत. पगार बेताचाच आहे. यांची फॅमिली मोठी नाताजलेली; मातोश्री तर विचारूंच नका. माऊलीच ! वडील बंधू तर शंभुचाच अवतार; तशीच यांची वहिनी, अगदीं परोपकारी सारांष कुटुंब बघायला नको.

**कामेश्वर**—भाई चला आता बराच वेळ झाला. वहिनी वाट पहात असतील, कारण सुलु बरोबर आहे, तेव्हां त्यांचा जीव कावरा बावरा होईल. म्हणून म्हणतो चला.

**भाई**—[ स्मित हास्यानें ] ऐकलंत भोलानाथ, ऐका ! बंधूच्या पत्नीची इतकी कळकळ. यावरून उद्यां लग्न झाल्यावर स्वतःच्या बायकोला तर डोईवर घेवून नाचतील. किती थोर ! किती मायस्थ, किती प्रेमळ यांचं मन तरी ? [ कामेश्वरास ] बरं चला मिस्टर. [ उठतो. ] ( सर्व उठतात. )

**भोलानाथ**—[ कामेश्वरास ] बरं महाराज, आपली जुनी ओळख आज नव्या स्वरूपांत झाली म्हणावयाची. [ सुलुच्या हनुवटीला हात लावुन ] नांव काय तुझं बाळ !

**सुलु**—( लाजत ) सुल्लु !

**भोलानाथ**—सुलु, ( पाठिवरून हात फिरवीत ) आहे. आहे हुषार आहे.

**भाई**— ( ऐटींत ) हुषार ! अहो काय सांगुं भोलानाथ, बापापेक्षां या मुलीचा जीव काकावर, बापाला ओळखतच नाहीं मुळीं, जणुं यांचीच मुलगी ! गाणं कसं फक्कड बोलते पण.

**भोलानाथ**—अस्सं ! अरे वा, मग जातां जातां, मला तरी थोडं ऐकूं द्या. ( सुलुस ) बोल बरं बाळ. माझ्याकडं कनई बाजाची पेटी आहे, तबला आहे, फोनो आहे, तुलाच देईन बरं बाळ, बोल.

**कामेश्वर**-(सुलुस) चल बोल लौकर. आपल्याला जायला वेळ होतो, बोल.

**सुलु**—[ खालीं मान घालून ] कुतला म्हनुं ?

**भाई**—अग म्हण कुठलं तरी. तुला जें येतं तें म्हण.

**कामेश्वर**—म्हणायचं असेल तर म्हण. नाहीतर चल.

पद ३ रें.

**आवची ग काकाला थांग तिला मायली ने । ति० ।**
**कामाकाजाची मुळींच नाय । सासू जाऊला मानीत नाय ।**
**आड काठिग । आम्हां मर्दाग । आली कशीग ।**
**ह्याना तिला ग । हंटलने । आ० ॥ १ ॥**

**भोलानाथ**—[ सुलुची पाठ थोपटून ] शाबास, कुणी शिकविलं बाळ तुला हें गाणं ?

**सुलु**—[ लाजत ] आईनी.

**कामेश्वर**—[ओशाळून] छेहो. ती शाहीर भुचाड्याची एक रेकॉर्ड आहेना. त्या चालीवर आमच्या वहिनींनं गमती गमतीनं रचविलं.

**भाई**—बरं महाराज बसा. येतों आम्ही.

[ भाई. कामेश्वर व सुलू जातात ]

**प्रभा**—[ प्र. क. ] बाबा; भाईबरोबर त्या मुलीला घेवून आले होते ते कोण हो.

**भोलानाथ**—ते होय ! ते तुला पाह्याला आले होते. तुझे भावी पती. कां आहेत का पसंत ?

**प्रभा**—इश्शं ! हें काय बाबा तुमचं भलतंच विचारणं. कॉलेजकुमारीप्रमाणं लव्ह म्यॅरेज करणारी मी नव्हे. तुम्ही माझ्या कल्याणाच कराल पण—

**भोलानाथ**—कां थांबलीस कां ? काय असेल तें स्पष्ट बोल.

**प्रभा**—दुसरं कांहीं नाहीं. त्या इसमाला पाहिल्याबरोबर मला वाटलं गोव्यांतील मंगेशाच्या देवळासमोरील दीपमाळ कीं काय ! बाई, बाई, बाई, केवढा ऊंच प्राणी तो !

**भोलानाथ**—प्राणी ! खुळी आहेस तूं. अग ऊंच असलेले नवरे कोणत्या बाईनं सोडून देऊन ठेंगुशीं संसारबद्ध झाली आहे. [ रीष्ट वॉच पाहून ) अरे नव वाजले. चला जेवायला.

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश ४ था.

[ स्थळ—रस्ता. कामेश्वर व भाई बोलत बोलत प्रवेश करतात ]

**भाई**—सुलेला तिच्या आईकडं पोचवून आलांत ठीक झालं. आतां आपल्याला विलंब झाला तरी चिंता नाहीं. बरं कसं काय ? आहे का पसंत ?

**कामेश्वर**—पसंत ! अहो पसंत म्हणून काय विचारतां भाई ! तिला पसंत न करणारा, म्हणजे केवळ तो अरसिकच असला पाहिजे.

**भाई**—व्हेरी ग्लॅड ! बरं आतां पुढं !

**कामेश्वर**—मी सांगतो असं करा. उद्यां आमच्या विरोधक भाऊजीना तुह्मी भेटा; आणि त्यांचा कल पाहुन मोठ्या शिताफिनं हि गोष्ट त्यांच्या कानावर घाला आमचे ते पुढारी, तेव्हां त्यांच्या सल्ल्या शिवाय आमचं पाऊल मुळीच हालायचं नाहीं. तुम्ही मला भोलानाथाच्या घरी घेऊन गेलांत, तें मात्र त्याना मुळीच कळता कामा नये.

**भाई**—त्या विषयीं तुम्ही अगदीं बेफिकिर असा. माझी पारख तुह्माला नाहीं अहो जायचं असलं रामवाडीत, तर सांगेन विठ्ठलवाडी. असा मी माणूस आहे बरं येतो मी. ( जातो. )

**कामेश्वर**—( स्वगत ) हा वेळपर्यंत लग्न करण्याचा माझा निश्चय नव्हता. पण त्या भोलानाथाच्या मुलीची सौंदर्य प्रभा फांकतांच, माझ्या निश्चयाचा अंधार कोणत्या दरीखोऱ्यांत दडाला कोण जाणे. आणि आतां लग्न करावं तर तिच्याशींच असं वाटुं लागलं आहे. ( विचार करून ) बरं मी लग्न केलं ! ( थांबून) तर मग वहिनीचं कसं कारण—

पद ४ थें.

**विषयांकिता । मन हे सदा । नच साहिना । विरहा कदा ।**
**जन शंकिता । अनुलोभ पाहतां । गृहिणी विना ना ।**
**हरि आपदा ॥ १ ॥**

( चलंभट व खंडोबा बोलत बोलत येतात )

**बलंभट**—( तपकीर ओढीत ) असं बघा बंडोबा. भोलानाथजींची मुलगी ( तपकीर ओढीत) जर कां तुमच्या बंधूस लाभली तर ( शिंकुन ) सोन्याहून पिवळें ! असे बघा बंडोबा, त्या मुलीशिवाय भोलानाथास दुसरें आपत्य नाही. बरें जवळ ( हातानें आविर्भाव करुन ) डबोलें आहे. असें बघा बंडोबा; जांवयास कांही उणे पडायचें नाही बरं. मुलगी बरी आहे. रंगानें राखाडी नव्हे. असें बघा बंडोबा, भरतकाम, कशिदा, वगैरे वगैरे काढण्यांत कुशल, बरं कूळ शीलवंत आणि मुंबईकर, असें बघा बंडोबा, [ तपकीर ओढीत] कामेश्वरास अशी पत्नी लाभणें म्हणजे त्याचें [ शिंकून ] भाग्यच !

**बंडोबा**—भटजी. त्याचं एकदां लग्न झालं की, गंगेला घोडं न्हालं. मला त्याचं कांहीं नाहीं. अहो तो काय वेडावांकडा आहे ! माझ्यापेक्षां किती तरी सुरेख दिसतो. भटजी, आम्ही त्याच्या लग्नाची खटपट सतत तीन वर्षं सारखी करीत आहोत, पण जिथं जावं तिथं आपला नकार ! काय असेल तें असो बाकी मला त्याचं काही नाही.

**बलंभट**—[ तपकीर ओढीत ] असें बघा, बंडोबा, तुमच्या बंधूस कोणीच मुलगी देत नाहीत असे बरीक चार चौघांत बोलूं नका. प्रयत्नांति परमेश्वर. आतां हें आलेलें सावज मात्र सोडतां कामा नये हो.

**बंडोबा**—पण भटजी, मी काय करणार, सर्व कांहीं आमच्या तिच्या हाती आहे. माझ्याकडं कांही नाही !

**बलंभट**—समजलों, समजलों. कामेश्वराच्या लग्नासंबंधी सर्व कांहीं तुमच्या कुटुंबाकडे आहे. असेंच ना ?

**बंडोबा**—हो, कामू आणि आमची ती काय तें पाहतील. मला कांहीं नाहीं, शिवाय भाऊजी, माई, ताई, आहेतच कीं.

**बलंभट**—बरं बंडोबा, मी सांगतों असें करा.

**बंडोबा**—( डुलत ) कसं करूं ?

**बलंभट**—असे बघा बंडोबा, परवां रात्री मी स्वतः भोलानाथच्या बिऱ्हाडी गेलो आणि त्यांस कामेश्वराची खोटीच कुंडली दाखविली. हो, शिवाय कुलस्वामीचा प्रसाद उत्तम झाला अशी लोणकढी दिली. एवढी कामगिरी मी केली. आतां पुढलं तुम्हा करा—

**बंडोबा**—छे, छे, छे, छे, भटजी. अहो मी काय करणार, मला त्याचं कांहीं नाहीं.

**बलंभट**—( तककीर ओढीत ) असे बघा बंडोबा तुम्हांस कांहीं एक करायचं नाहीं. फक्त कुलस्वामीचा प्रसाद उत्तमचीवेचा झाला असें खोटेंच भोलानाथास सांगायचे दुसरें कांही नाहीं.

**बंडोबा**—छे, छे, छे, भटजी. मी खोटं बोलूं होय !

पद ५ वें.

**छे, छे, मला तेही कांही नाहीं । छे. । लग्न कार्य फोल बोला बोलु केवीं, अशुभदायीं । छे. । कुलदैवताचा प्रसादचिसाचा । सुखासि सीमा, नुरे कदाही । छे, छे. ॥ १ ॥**

**बलंभट**—असे बघा बंडोबा, स्वार्थाकरितां व त्यातून लग्न कार्याकरितां बेधडक खोटे बोलावें त्यांत पाप मुळीच नाही. मी सांगतों असे करा. तुमच्या भाऊजीकडे भोलानाथाला घेवून भाई आज जाणार आहेत. तेव्हां असे बघा बंडोबा, तुम्ही तिथे जा. दादासाहेबही तिथं असणारच. काय काय होईल तें निमूटपणे ऐका.

**बंडोबा**—बरं तर भटजी, तुम्ही सांगतां तर जातो मी, पण एक अवाक्षर देखील काढणार नाही तिथं.

**बलंभट**—बर तुम्हीं कांहीं करूं नका. पण जाल किंवा नाही.

**बंडोबा**—हो, हो, हा चाललों पहा मला त्याचं कांहीं नाही. [ जाऊं लागतो पुन्हां मागे वळून ] भटजी.

**बलंभट**—कां मागें कां वळलांत ? काय विसरलात ?

**बंडोबा**—नमःस्कार करायला विसरलो भटजी. शिष्टाचार आहेना. म्हणून परतलों. ( हात जोडुन ) बरं नमःस्कार भटजी. [ डुलत डुलत जातो.]

**बलंभट**— ( स्वगत ) या बंडोबाचा स्वभाव किती तरी थंड; बंडोबाच्या ऐवजीं याना थंडोबाच म्हणायास हवें होतें त्या विषयाबाईपुढे हे बंडोबा थंड पडतात. काय त्या बाईचा दरारा नवऱ्यावर ! याला ती नेहमी सळों की पळों करून सोडते. तसाच तो कामेश्वर, सर्वांपाशी कर्दनकाळ, पण त्या विषयाबाई पुढें कुळुंगा कुत्रें बरें. तीच्या शिवाय कामेश्वराचे पाऊल हो हालायचे नाही काय त्या दोघांचे सुत्र असेल ते देव जाणे आपणास कशास हवे. [ तपकीर ओढीत ) बोलन चालन आम्ही [ शिकतो भिक्षुक ! [ जातो. ]

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**–विरोधकाचे घर,—विरोधक, दादासाहेब, बंडोबा, भोलानाथ, व भाई खुर्च्यांवर बसले असून चहापान चाललें आहे. बाजुला म्हाळसा उभी आहे.] [ पडदा उघडतो. ]

**विरोधक**—( भोलानाथास ) तुमचा आमचा जुना स्नेहसंबंध. पण ईश्वरी नियमानियम कसा आहे तो पहा. या मंगळ कार्याच्या निमितानं तो वृद्धिंगत व्हावा. पण ही सारी भाईची खटपट हो. ( हांसतो. )

**भाई**—माझी कसली खटपट, मी अर्थाक तें काय करतो. आजकाल जगांत आहे काय ? " परोपकारार्थ पुण्यार्थे " कुणाचं तरी बरं करावं, अखेर आपल्या बरोबर येणार काय ? फक्त कीर्ती ! यांच्या मुलीसाठीं मी जी खटपट करतों ती कांही मला परकी नव्हे. माझी मामेबहिण ती. तेव्हां बहिणीचं कल्याण व्हावं अशी कोणत्या बंधूची इच्छा नसणार. त्यांतून सज्जन व कुटुंबवत्सल घराण्याची आशा कोणाला नसणार ? काय दादासाहेब !

**दादासाहेब**—वाः खूप ठेवून दिलीत बुवा. बाकी एवढं खरं, भाऊजी. या भाईनं बऱ्याच लोकांवर उपकार केले आहेत, कोणाची लग्न जुळवायची कुणाला नोकऱ्या लावायच्या, अनाथ गतभर्तृकांना हातभार लावायचा, अशा बऱ्याच प्रसंगी हे लोकांच्या उपयोगी पडले आहेत.

**भाई**—दादासाहेब, आजपर्यंत जे जे म्हणून मी केलं आणि तूर्त जे करीत आहे तें सर्व ईश्वराच्या दरबारी रूजू आहे. एवढं बरीक खरं की, माझ्यावर प्रसंग पडला मग मात्र मला कुणीच साह्य करीत नाही. अहो हेंच बघाना, माझ्या बायकोनं मला सोडल्यापासून दुसऱ्या नव्या बायकोसाठीं मी थोडाका प्रयत्न करीत आहे. ज्यांच्या त्यांच्याकडं सारखा याचना करीत असतों. पण छट्, उलट लोक माझी निंदाच करतात. कुणी म्हणतात की, तुम्ही पुनर्विवाहाची करा, कुणी म्हणतात नायकीण ठेवा; कुणी म्हणतात कीं, एखाद्या बाईचं डळमळीत सौभाग्य अढळ करा. अहो, एवढंच नव्हे तर कुणी म्हणतात की, एखाद्या गंगाभागिर्थीला माळ घाला. ( सर्व हंसतात. )

**दादासाहेब**—बरं, भोलानाथजी, ज्या कार्याकरितां या ठिकाणी आपण जमलों आहोंत, तें कांही लहान सहान नव्हे. लग्नगांठ म्हणजे जन्मगांठ. शिवाय आमच्या कामेश्वराला तुमची मुलगी पसंत आहे असं मी आपलं बाहेरून ऐकतो हो.

**विरोधक**—( आश्चर्यानें ) काय म्हणतां दादासाहेब, खरं किं काय? तर मग दुधांत साखर पडली म्हणायची. मग देण्या घेण्याचा विचार करू या तर.

**दादासाहेब**—हो, मी तेंच म्हणतों (स्मित हास्यात) कसं काय भोळानाथजी तुमचं काय म्हणणं बोला पाहूं.

**भोलानाथ**—काय बोलु दादासाहेब, माझी परिस्थिती गरीबीची, केवळ नोकरीवर सारी गुजराण, माझी ही शेवटची मुलगी, तव्हां सात्वीक व कुटुंब वत्सल असं मुंबईकराचं घराणं तिला लाभावं, ही माझी इच्छा. हुंड्यासंबंधी आपल्याला वाटेल तसं करा.

**भाई**—मला वाटतं हुंड्यासंबंधी, आमच्या ताईसाहेबानं काय तें स्पष्ट सांगावे. कारण हुंडा ठरवायचा तो बायकानी, खरं ना ताई?

**म्हाळसा**—यांचं प्रथम काय म्हणणं आहे. तें ऐकूंया. नंतर मी सांगेन.

**भाई**—अस कसं! हुंड्याची मागणी तुमच्या बाजूनं झाली पाहिजे. कारण हुंडा घेणार तुम्ही. नंतर भोलानाथ काय ते सांगतील.

**म्हाळसा**—बरं तसं कां होईना. असं बघा, तुमची मुलगी चांगल्या खानदानीच्या कुटुंबांत पडेल, होयना? बरं मुलगा कांही वाईट नाही. पैलवर हुषार, तरतरीत, निर्व्यसनी, सर्वगुणसंपन्न—

**विरोधक**—( मधेंच ) आणि ब्रायट बॉय.

**म्हाळसा**—अहो काय सांगु तुम्हाला त्याच्यावर किती लोकांचा डोळा. पण म्हटलं यांची मुलगी जर त्याला पसंत असली, तर त्याची निराशा कां करा. आजकालच्या मुलांना त्यांच्या इच्छेप्रमाणं करूं दिले पाहिजे. पूर्वीचा काळ गेला. आतां हा नवा काळ!

**भाई**—बरोबर, ताई असं पहा. त्या मुलीला नाही आई. बरं, यांचं उतार वय. मुलगी अगदी भोळी आणि थंड स्वभावाची, तव्हां ती आपली तुमचीच समजुत पदरांत घ्या म्हणजे झालं.

**झाळसा**—( हेळा काढुन ) होयच तर ! अहो ती एकदा आमची झाली की आम्ही तीला मुली प्रमाणंच समजणार.

**भोलानाथ**—त्यातून मी एकटा. कार्याला हातभार लावायला माझ्या बाजूनं कोणि नाहीं. दोन्ही कडलं तुम्हालाच पहावं लागेल. मी आपला नामधारीच समजा. सर्व रक्कम तुमच्या पाशीच देइन. [ गहिवरून ] फार काय बोलुं कन्यादान तुम्हीच करा. तुमचीच मुलगी ती. [ डोळे पुसतो. ]

**विरोधक**—छे; छे; असें अश्रु काढुं नका बुवा. आम्हाला वाइट वाटतं ( डोळे पुसतो. ) तुम्ही मुलीचे वडील हयात असतां, आम्ही कन्यादान कसं करणार हो ? लोक काय म्हणतील.

**भाई**—[ डोळे पुसुन ] खरंच. सोंपल. मलातर यांची अतिशय कींव येते.

**विरोधक**— [ म्हाळसेस ] बरं तर मग आता तूंच सांग एकंदर आंकडा सांग.

**दादासाहेब**— [ मान हालवुन ] बरं ताई तूंच सांग.

**झाळसा**—सगळे मिळुन दोन हजार द्या. मुलीच्या अंगावर बाळ लेणं असेलच.

**भोलानाथ**— हो. आहे. पांढरपेशांच्या मुलीच्या अंगावर त्यांची कितीही गरिबी असली तथापि वाल, दोनवाल सोनं हे अ ायचंच

**झाळसा**—[ हेळा काढुन ] होयच तर ! तुमच्या मुलीच्या अंगावर काय काय आहे ते सांगा आधी.

**भोलानाथ**—मोठ्या मण्याची एक मोहन माळ चार बांगड्या सोन्याच्या आणि मोत्यांची कुडी सुमारे पांचशे पर्यंत ऐवज आहे.

**झाळसा**—[ हेळा काढुन ] होयना ? झालं तर मग, त्या मुली शिवाय तुम्हाला तरी आतां कोण आहे. तुमचं हे शेवटचंच कार्य.

**भोलानाथ**—बरं. सर्व मिळुन दोन हजार म्हणालात ते कसं काय.

**विरोधक**— [ म्हाळसेस ] हो. तूं कसा काय हिशेब केलास ते याना सांग. [ भोलानाथास ] भोलानाथजी हिचा हिशेब किनई अगदी ॲक्युरेट असतो अहो अशी शेंकडोशीं कार्यें हिच्या हातून झाली आहेत. ( म्हाळसेस ) सांग याना.

**म्हाळसा**—बरं तर सांगते ऐका. ( बोटे मोडुन ) वरदक्षणा ८५०, गर्भदानाचे १५०, बाळंतपणाचे १५०, तीन शिक्याचे १००, आणि लग्नखर्चाचे २५०, शिवाय बाळलेण्याचे ५०० आहेतच. झालेना एकंदर दोन हजार !!

( भाई व भोलानाथ विस्मयानें एकमेकांकडे पहातात. )

**भाई**—ऐकलंत भोलानाथ. आतां काय बोलायचं असेल तें बोला.

**भोलानाथ**—मी काय बोलूं. पण मी असं म्हणतों की, गर्भदानाची आणि प्रसुतीची रक्कम अगाऊ कशाला. नंतर दिली तर नाही कां चालणार

**विरोधक**—तसं नव्हे भोलानाथजी, तुम्ही एकटे, तुम्हाला नाही बायको. तेव्हां गर्भदानाची आणि प्रसुतीची व्यवस्था, तुमच्या घरीं करणार कोण ? ते सर्व आम्हालाच करावं लागणार; म्हणुन ती रक्कम अगाऊ दिलेली बरी.

**भोलानाथ**—असं काय ठीक. बरं पण " तीन शिक्के " ते कायहो.

**विरोधक**—(आश्चर्यानें) म्हणजे, तुम्ही मुंबईकर म्हणवितां, आणि तुम्हाला तीन शिक्के ठाऊक नाहीत. ( हांसत ) आश्चर्यच.

**भोलानाथ**—नाही. खरंच नाही. " तीन शिक्के " हा शब्द मी केव्हांहि ऐकला नाहीं.

**दादासाहेब**—थोरल्या मुलीचं लग्न केलंत, त्यावेळी त्या जांवयाला तीन शिक्के नाहीं का दिलेत.

**भोलानाथ**—छट, मुळीच नाही. त्या जांवयाला तीन शिक्के दिलेले मला कांही स्मरत नाही. कशावर द्यायचे असतात ते शिक्के ?

**म्हाळसा**—अहो तो जांवई जर मुंबईकर असता, तर त्याला तीन शिक्के द्यावे लागले असते. कोकण्या तो, कोंकणी लोंकांना कसले हो तीन शिक्के आणि चार शिक्के ! मुंबईकरांच्या चाली रिती त्याना काय ठाऊक, ते नेहमी म्हणतातच की. " मुंबयकराचो होंकाल मेळ्ळो की मगे झालो " नसंबान घो खांवचो.

**विरोधक**—काय काय नसबान घो खांवचो, हो: हो: ही: म्हणजे ?

दादासाहेब—बरं ताई सांग यांना तीन शिक्क्याचा अर्थ काय तो.

म्हाळसा—कसला अर्थ आणि अन्वय घेऊन बसलांत. लग्नानंतर पहिल्या वर्षांत जे जे म्हणून सण येतात, त्या त्या सणाला मुलीच्या माहेराहून जांवयाला भेटी पाठविण्याची रीत आपल्या मुंबईकरांत असते, तेव्हां त्या रितीला तीन शिक्के म्हणातो हो. समजलांत.

भोलानाथ—असं असं. हे मला मुळीच ठाऊक नव्हतं. मग ती रक्कम सुद्धां मी अगाऊ द्यावी असंच ना ?

विरोधक—हो. म्हणजे मग तुम्हाला त्रास नाही. आमचं आम्ही पाहुं. पण ही सर्व रक्कम बर्फी वाटण्यापूर्वी आमच्या हातीं आली पाहिजे बरं का.

भोलानाथ—म्हणजे एकंदर दोन हजार ना !

विरोधक—हो. दोन हजार.

भोलानाथ—ठीक. भाईबरोबर सर्व रक्कम उद्यांच पाठवितो.

विरोधक—[ आनंदाने ] थ्यँक्स. आणखी एक प्रायव्हेट गोष्ट सांगायची आहे तुह्माला.

भोलानाथ—कोणती ?

विरोधक—तुमचं आमचं हे जुळलेलं, अगदी गुलदस्तातच ठेवा बरं का एव्हां कुणापाशीं कांहीं बोलुं नका. आमंत्रण पत्रिका बाहेर पडण्या पूर्वीं हें षट्कर्णी होता कामा नये.

म्हाळसा—[ खोटं नाय. अहो विघ्नसंतोषी लोक पुष्कळ असतात. लग्नात विघ्न आणायचा मेल्यांचा धंदाच असतो. काय सांगु तुह्माला. माटवात आलेले वर परतुन जातात.

भाई—छे छे, आह्मी कशाला कुणापाशी बोलणार, उलट आमचं नुकसान व्हायचं.

भोलानाथ—बरं विरोधक भाई, लग्नाची जागा तुह्मी ठरवा, आमंत्रण पत्रिका, गवई, नारळ, ब्यँड, व चौघडा हें सर्व मी पाहतो.

दादासाहेब—आणि भोजन डीपार्टमेंट आमच्या ताईकड.

म्हाळसा—हो. आचाऱ्या वाढप्याचं मी बघतें.

विरोधक—आणि जागा म्हणाल तर आपण एकाच घरांत करूं नवरा वर नवरी खाली.

**दादासाहेब**—बरं भोलानाथजी, कोणतंही कार्य करायचं झालं तर तें कायदेशीर झालेलं बरं. आतां पर्यंत तुमचा आमचा हा सारा तोंडी व्यवहार झाला. तेव्हां मला वाटतं की, पांढऱ्यावर काळं झालेलं बरं. म्हणजे मग कुणाच्याहि मनांत काळंबेरं यायला नको हो. [ खिशांतून एक कागद काढून ] हें पहा. मी एक कागद लिहून आणलं आहे. आतां यावर फक्त ठरलेली रक्कम म्हणजे दोन हजार घालायची आणि तुमची सही एक कॉपी तुमच्यापाशी आणि एक आमच्या पाशीं. पण प्रथम नीट वाचा. आणि नंतर सही करा हो. (कागद देऊं लागतो तोंच पुन्हां) पण थांबा. आंकडा घालतो. ( फावन्टनपेनने कागदावर आंकडा घालतो नतर तो कागद भोलानाथास देतो. )

**भोलानाथ**—वाचूं का ?

**दादासाहेब**— हो, हो. वाचा, वाचा. अहो हा व्यवहार आहे. भोलानाथजी व्यवहारांत सरळ असणं उत्तम. वाचा मोठ्यानं वाचाहो.

**भोलानाथ**—( वाचुं लागतो. ) " मी खाली सही करणार स्वसंतोषाने व राजीखुषीने असे लिहून देतों कीं, माझी मुलगी चि. प्रभावती इचा विवाह कै. भद्रेश्वर प्रियोळकर यांचा कनीष्ट पुत्र ची. कामेश्वर यांच्या बरोबर करण्याचें निश्चित केले आहे, तत् प्रित्यर्थ ठरलेला हुंडा रुपये दोन हजार अक्षरी दोनहजार बर्फी वाटण्या वूर्वी मी देईन; न दिल्यास नियोजीत लग्नाचा ठराव रद्द केला जाईल. "

**विरोधक**—समजलं हो. यांत कांही अर्थ नाही. ( भोलानाथास ) कराहो सही.

**भोलानाथ**—( विचार करून ) सही करतो. पण ही नवीन पद्धत कुठली? लग्नाचं कॉन्ट्रक्ट ! लग्नाचं कॉंट्रॅक्ट आजपर्यंत कोणी केलेलं मला कांही आठवत नाही. घराची, नाटकाचीं,कापसाची वगैरे कॉन्ट्रॅक्ट करतात. पण लग्नाचं कॉन्टॅक्ट?

**विरोधक**—(मोठ्यानें हांसून) अहो हे कॉन्टॅक्ट नव्हे भोलानाथजी; तुह्माला आमची आणि आह्माला तुमची शुअरटी भलतीच शंका मनांत आणूं नका.

**भाई**—ठीक द्या तर पेन.

( दादासाहेब भोलानाथास फाउन्टन् पेन देतो. भोलानाथ दोन्ही कागदावर सही करून एक आपणांपाशी ठेवतो व एक विरोधकांस देतो. ड्राप पडतो. )

**—अंक १ ला समाप्त —**



भोलानाथः—पण लग्नाचं कॉन्ट्रॅक्ट ? [ अंक १ पान २४ ]

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

( स्थळ—कामेश्वराचें घर. कामेश्वर बाजेवर बसला आहे व बाजुला विषया रागानें फणफणत उभी आहे. पडदा उघडतो. )

**विषया**—( झणकाऱ्यानें ) पुरे झालं तुमचं हे कपटी प्रेम ! काका, माझ्याशी एक शब्द सुद्धां बोलूं नका. तुमचं लग्न झाल्यापासून दोन महिन्यांतच स्वभावांत कितीतरी फरक पडला. कायसं मेलं म्हणतात ना, " नव्या बायकोचा मोठा मान आणि जुनी प्रिती वैऱ्यानमान ! तुमच्या राणी साहेबांच्या गर्भदान दिवशीचा फार्स विसरलें नाहीं मी ! आहे ठाऊक मला तुमचं सारं ! काका, मी नांवाची विषया आहे बरं विषया. मीच चांडाळणीनं मूर्खपणा केला, आणि तो माझा मलाच भोवला. तुमचं झालं लग्न, आणि मला आलं विघ्न !!

**कामेश्वर**—( उठून ) वहिनी, कांहीही झालं, तरी जुनं ते सोनं. मी पंचवीस लग्न केली तरी ( तिच्या हनुवटीस हात लावून ) या जीवाला कधिंही विसरणार नाही. तुमचं माझं प्रेम आजकालचं का आहे ? मग भऊभलते विपर्यास कां बरं घेतां. नर्मदेंत विशेष ते काय आहे. त्यापेक्षां तुमचा हा—

### पद ६ वें.

**मुखचंद्रमा उदेला । मन सागर रिझवायाला ॥ मु. ॥**
**आतुर झाला । जीव भुकेला । प्रीति रसाचा प्याला ।**
**अति प्रेमें सेवायाला ॥ म. ॥ १ ॥**
**सुमन तूंचि भ्रमर मीच । घालि भवति तव पिंगा ।**
**अति लोलुप मकरंद लुटाया । झाला वेडा पायि अनंगा ॥२॥**

**विषया**—( स्मित हास्यानें भुरका मारून ) पुरे करा थट्टा ! तो नर्मदेचा थेरडा बघा. झालं मेल्याचं वाटोळं. मेला मरतहि नाही. पोरीला भेटण्याच्या निमित्तानं प्रत्येक शनिवारी इकडं येतो. मी आणि भाई नर्मदेच्या गाऱ्हाणीं सांगु लागलों की मेला बोलतो कसा [ वेडावून] जाऊं द्याहो माई. ती पोर आहे बाळपणापासून कौतुकानं वाढवलेली. तुम्ही तिच्या आईच आहांत, असं नी तसं. मेला बोलण्यांत पटाईत, जणुं गिरणीचा पट्टाच.

**कामेश्वर—**तो थेरडा आला तर त्याच्याशी तिला न बोलूं देण्याची **खबर** दारी ठेवा बरं का.

**विषया—**ते सांगायला का हवं! तो थेरडा आला तर तिला हांक मारल्या शिवाय स्वयंपाक गृहांतून तिनं बाहेर येतांच कामा नये. अशी सक्तमनाई मी आणि माईनं तिला केली आहे. कसं काय म्हणून बापानं विचारलं तर नुसती तिनं मान हालवायची.

**कामेश्वर—**हो, नाहीतर मारहाण होते म्हणून सांगायची बापाला.

**विषया—**तिची काय छाती, चांगली भरडून काढीन पीठासारखी. ( लडिवाळपणानें ) पण काका, खरंच सांगा गडे, माझ्यावर पूर्वीप्रमाणंच तुमचं प्रेम आहे ना?

**पद ७ वें.**

**सत्यबोला प्राणसखया। प्रेमसिंधू आटलाकां। स.।**
**मिलन सरिता भाव विमला। उमज केवीं सागराला।**
**स्वपती सौख्या आंचाविले। प्रेमि तुमच्या रंगले ना।**
**लग्न होता गोजीऱ्या त्या। सवतिरूपा भाळला ना॥ १॥**

**कामेश्वर—**काय भलतंच बोलता वहिनी. मी लग्नच केलं नसतें. पण तुम्ही आग्रह केलात म्हणुन तर ही लग्नाची बेडी मी पायांत अडकविली. तुमच्या इच्छेप्रमाण नर्मदेकडं नाही कां मी वागत? रोज तिला लाथाबुक्यानं मारतो. चरचरीत चिमटे काढतो. भींतीवर आदळतो. इतकंच नव्हे तर तीचा चहा सुद्धां बंद केला. आणखी मी काय बरं करूं.

**विषया—**ती सटवी अलिकडं किनई बरीच शेफारली आहे. परवां तीच्या माहेराहुन तो मान वांकड्या शिवजी वाणी आला होता, त्याच्याशी कशी चुरू चुरू बोलत होती. त्यावेळी माई घरांत नव्हत्या. अहो तो मेला मानवांकड्या इतका निर्लज्ज, बोलता बोलता खुर्चीवर किहो बसला. जणूं घरचाच यजमान. त्यावेळीं मला त्याचा असा राग आला की त्या मेल्याची ती वांकडी मान सरळच करावी.

**कामेश्वर—**तिच्या माहेराहून इथं कुणीच येतां कामा नये. असा कांहीतरी बंदोबस्त केला पाहिजे.

**विषया**—हो. काका, प्रथम त्या थेरड्यालाच इथं येण्याची बंदी करा. ( पडद्याकडे पाहून ) अग बाई, काका त्या बघा माई आणि वन्सं इथं येताहेत.

[ विषया दूर उभी राहते तोंच माई व म्हाळसा येतात. अंगावरील शाली बाजुला ठेवुन माई कमरेवर हात धरीत बसते व बाजुला म्हाळसा बसते.

**कामेश्वर**—ताई नर्मदेचं बंड भाऊजींच्या कानावर घातलंस का ? काल-पासून तीनं घरांत पुंडाई माजविली आहे.

**म्हाळसा**—[ हेले काढीत ] सांगितलं बाबा त्याना. सारं सांगितलं. ते म्हणाले कीं, नर्मदेचा आतां निकालच लावला पाहिजे. येणार आहेत ते संध्याकाळी इथं. अरे पण तिचं म्हणणं तरी काय ? चारचौघांत आनंदात असायचं, बसायचं, वागायचं, ते हे गो काय बाये पीडा ! इश्श, रोजरोज मेली तंटे भांडणं कसली ? गृहस्थाचं घर की नायकिणीचं.

**कामेश्वर**—मी वहिनीपाशी मुळीं बोलुंच नये, असं तिचं म्हणणं.

**म्हाळसा**—ते कां ? वडील जाऊ ती, तिनं तर हिला सासुच्या ठिकाणी मानली पाहिजे. हिच्या नावाचा इट्ट कां ?

**कामेश्वर**—आतां तूंच पहा ताई, वहिनीशी तुसडपणे वागते, वहिनीच्या नावाने दगड फोडते. मग मी तरी गप्प कसा बसुं ? यथेच्छ बढवितों.

**माई**—अरे पण मारून मारून माणूस कोडगं होतं ना बाबा ! तुला समजे नाय. [ह्माळसेस] आगो कामार मुळीच तिच चित्तच नाय. जेम तेमसां जसकाळचा संयपाक कसा बसा फोडते. आपुण पूर्व म्हटलं तर ती म्हणे पश्चिम. अगदी हाट्टी गो बाये !

**विषया**—वन्सं. तिचा बाप काय पण मोठमोठ्या थापा मारतो. ह्मणे तिच्या आईच्या पश्चात् तीन वर्षे आपला संसार मुलीनच संभाळला.

**माई**—आगो ओगी बस. काय त्या म्हातारड्याच्या थापार विश्वास ठेवतेस. मेला नाटक्या तो.

**कामेश्वर**—माई मला सांगतो; की, माझं सारं तुमच्या स्वाधीन करून मी गोव्याला जातो. आणि म्हणे देवाच्या दारी बसतो.

**विषया**—( अंग हालवुन ) हो. आहे ठाऊक ! देवाच्या दारी तो बसणार ! भलतंच, अहो तो गोव्यातील देवींच्या दारी बसेल; देवींच्या. तिकुडचा तो पुंड. सगळ्या नायकिणी मेल्याच्या ओळखीच्या. जसा काय गोपींचा कृष्ण !

**माई**—( म्हाळसेस ) खोटं नाय ! मेल्याची नजरच वाईट आगो तो इकडं आला की, मेला माझ्याकडं नागो एकमारखा टकटक बघतो. साठीकडे आली मी. आणि माज्यार नागो मेल्याची नजर. आगो काय सांगु म्हाळसे तुला: तो आला आणि जर का मी एकटी असली तर मला बाये, कांपरा भरतो. तुज्यान.

**नर्मदा** - ( प्र. क. ) चहा तयार झाला, आणु का बाहेर ?

**माई**—भायर कशाला, आम्ही आंतच येतो.

**नर्मदा**—नाहीं. आणते पाहिजे तर बाहेर.

**माई**—आगो, नको बाये. भायर कोणी येतय, जातय, इतक्यांत कोणी आलं तर त्याला आणखी द्यावा लागेल. जा तूं आंत, आह्मी येतो.

**नर्मदा**—तुम्ही कशाला उठता ? आणते मी बाहेर ?

**कामेश्वर**—[ रागानें ] किती बेशरम पहा. आह्मी आंत येतो, असं माई सांगतात, तरीं म्हणे चहा बाहेर आणते. उद्धट, निर्लज्ज.

**विषया**— हो, पण आतां माई चूप बसतील. बोलायच्याच नाहींत मुळीं.

**माई**—(डोक्यावर हात धरून ) माला बाये बोलवे नाय. बोलुन बोलुन छातिन् कळ मारते. मेल मरण येईल तर बरं मी सुटेन.

**कामेश्वर**—( संतप्त ) ऐक. हलकटे ऐक. माई काय बोलल्या ते ऐकलस, बेशरम. ( तिला धक्की मारून ) चल निघ येथुन. कर काळं. चल नीघ.

**नर्मदा**—अहो पण विनाकारण मला शिव्या कां देतां. मी काय बोललें ? चहा बाहेर आणूं की नको एवढंच ना ?

**कामेश्वर**—( संतप्त ) चूप. फार बोलशील तर दाखवीन चौदावं रत्न. हो चालती.

**म्हाळसा**—अरे पण तुं कशाला उगाच शिरा ताणतोस. बोलेना बोलली तर.

**कामेश्वर**—काय ? बोलली तर मी लाथेन तुडविन, लाथेन.

**नर्मदा**—पण मी काय बोलले.

**विषया**—बघा. अजुन तरी तोंड बंद करते कां बघा. काका, तुमच्या डोक्यावर उद्यां ही मिऱ्या वाटेल ! बरं मिऱ्या ! आतां तुमचा राग गेला कुठं॰ थंडावला वाटतं.

**कामेश्वर**—काय, माझा राग थंडावला ? मी पिसाळलों तर दाखवीन नृसिंह अवतार म्हणे राग थंडावला ! मी कांही बंडु भाऊ नव्हे.

**विषया**—त्यांचं मेलं सगळंच थंड, मग राग कसा नाही असणार ! पण तुम्ही एवढे शूरवीर म्हणवितां, मग आतां असें बिल्लं का ?

**नर्मदा**—वहिनी, काय हें तुमचं बोलणं. यानी अधिक संतापावं आणि माझा यथेच्छ कुंदिपाक काढावा, असंचना ?

**विषया**—ऐका, काका ऐका, ऐकलत ना कशी अवदसा कुज्जट बोलते ते ऐका. ह्मणजे माझ्या सांगण्यावरून तुह्मी हिला मारतां, असंच हिचं म्हणणं·

**कामे॰**—[ नर्मदेची गर्दन धरून ] काय काय बोललीस बेशरम ( चिमटे काढतो, मारतो ) काय बोललीस. ( नर्मदा रडुं लगते ) चुप चुप राहा.

**भाई**—अरे पण काम्या, काय हें घरात धुमशान ! आजुबाजुचे लोक काय म्हणतील.

**विषया**—[ अंग हालवुन ] म्हणतील पांढऱ्या पायाची अवदसा आणुन केलं सारं घरादाराचं वाटोळ.

**माई**—होयगो बाये होय. खोटं नाय. कसं आमचं घर होतं आणि कसं झालं.

**विषया**–इतका मार दिला तरी बघा मठ्ठ ! उभीच्या उभी. जणुं कुलाब्याची दांडी.

**नर्मदा**—योग्य उपमा दिलीत वहिनी. कुलाब्याची दांडी समुद्रांतील, जहाजांना काळ्या खडकावर न आदळण्याची धोक्याची सूचना देत असते.

**विषया**—( रागानें ) काय, काय बोललीस. काळा खडक ! ( रडव्या स्वरांत ) ऐका, ऐका. काका ऐका. हा मला टोला बरं ! म्हणजे मी काळा खडक ! ( पदरानें डोळे पुसते ).

**कामे०**—[ संतप्त ] काय वहिनी काळा खडक ! ठीक. आतां त्या काळ्या खडकानंच तुझा कपाळ मोक्ष करतो. थांब आलों मी. ( हात चढवित तोंडानें " काळा खडक " म्हणत जातो )

**म्हाळसा**—अगो नर्मदा बाय. अगो तुझी ही वडील जाऊना ? आणि हिला तूं काळा खडक बोलतेस ? लाज नाही वाटत तुला.

**कामे०**—( दोन्ही हातांनीं वरवंटा घेऊन प्र. क. ) चल ये अशी पुढं !

[ माई व म्हाळसा भयाभित होतात ]

आतां हा काळा खडक तुझ्या डोक्यात—

( चटकन माई व म्हाळसा कामेश्वराचा हात धरतात. सर्वांची आरडाओरड होते. तोंच पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

[ **स्थळ**—रस्ता, विरोधक व दादासाहेब बोलत बोलत येतात ]

**विरोधक**—दुर्दैव त्या बिचाऱ्या कामेश्वराचं. मोठ्या हौसेनं त्याचं लग्न केलं म्हटलं भोलानाथची एकच मुलगी तेव्हां वेळोवेळी जांवयाचं कौतुक होईल. पण काय उलट क्लेश मात्र लागले. त्या नर्मदेनं घरांत बरीच धुमाकूळ माजविली आहे दादासाहेब, आजुबाजुचे लोक म्हणे छीः थुः करतात. खरंच दादासाहेब, मी जर संतापलों तर दाखविन तिला माझा लष्करी बाणा.

**दादासाहेब**—दाखवाल बुवा. शंकाच नको. मागं त्या डॉक्टराला नाही कां दाखविलात लष्करी बाणा ! अहो तुमच्या त्या मारामारींत, मी आपला सहज सोडवायला म्हणून आलों, तर उलट माझ्याच पाठीवर दोन काठ्या सणसणीत किंहो बसल्या. तुमचा तो लष्करी बाणा आणि मी पडलों उताणा ! !

**विरोधक**—( मोठ्यानें हांसत ) हीः हीः हीः, अहो पण मी कांहीं कमी नाही केलं. त्या डॉक्टरच्या पोरांनी मला लाथेनं तुडीवलं; मला बाकेवर पालथा पाडला, माझी गर्दन धरली, माझ्या पेकाटावर लाथ मारली, तरीही न डगमगतां असा ताठ उभा राहिलों. ( ताठ उभा राहतो ) कां आहे कीं नाही माझा लष्करी बाणा ?

**दादासाहेब**—(पडद्याकडे पाहून ) अहो पण हें काय. हा बंडोबा घाबऱ्या घाबऱ्या इकडंच येतो आहे वाटतं.

**बंडोबा**—( कांपत कांपत) भाऊजी, भाऊजी अहो भाऊजी. च–च–चला लौकर. चला चला.

**विरोधक**—( विस्मयानें ) अहो पण काय काय झालं काय असं. आणि असे कांपता कां ?

**बंडोबा**—( थरथरत) कामूनं नर्मदेला बेदम मारलन्. तीला चक्कर आली. तोंडावाटे फेंस आला; डोळे पांढरे केले, आणि बघा, अशी ताठ झाली हो. ( ताठ होतो )

**दादासाहेब**—एवढं प्राणांती मारण्या इतकं तिनं केलं तरी काय ?

**बंडोबा**—मला कांही नाही ठाऊक काय झालं ते. मी आणि माई मॉर्नींग वॉकला चौपटीवर गेलों, घरांत कामू, नर्मदा आणि आमची ती. एवढींच. चौपाटीवरून आम्ही घरीं आलों, आणि पहातों तों काय कामू नर्मदेला सारखा धोपटीत होता. ते दृश्य पाहताच माईची कंबर खचली आणि माझी गाळण उडाली, बरं मी सोडवायला जाईन, तर एखादा टोला बसायचा माझ्या टाळक्यावर, तेव्हां तसाच धांवत पळत, तुम्हाला कळवायला आलों. चला चला भाऊजी चला. ( डुलतो )

**दादासाहेब**—बरं भाऊजी येतों मी. ( जातों )

**विरोधक**—बरं बंढोबा चला पाहूं. भिऊं नका चला.

**बंडोबा**—हो हो तुमी पुढं व्हा. मला त्याचं कांही नाही. ( जातात )

---

## प्रवेश ३ रा.

[ **स्थळ**—कामेश्वराचं घर. माई, विषया, कामेश्वर, बसले आहेत तोंच भोलानाथ प्रवेश करतो त्याला पाहून सर्व स्तब्ध बसतात )

**भोलानाथ**—( कांही वेळानें ) आज मंडळी स्वस्थ कां ? कसं आहे माई तुमचं ?

**माई**—( हलक्या स्वरांत ) चाल्लाय. बरं वाटे नाय. छातीन कळ मारते, कंबर धरलाय, उटवे नाय, बसवे नाय.

**भोलानाथ**—एखाद्या चांगल्या डॉक्टरचं औषध कां घेत नाही. जिवाची हयगई करूं नका. माई. तुम्ही वडील माणूस, तुमच्यामुळं घराला शोभा आहे.

**माई**—जळळी शोभा, करायचं काय मला जगून. आमच्या घरांत आता कली मातला आहे. आमच्या घराला उतरती कळा लागली, देवाने डोळेच बंद केले आहेत.

**भोलानाथ**—म्हणजे, असं काय बोलता माई. ( कामेश्वरास) जावयजी. तुम्ही गप्प कां ?

**कामेश्वर**—( कांहीच बोलत नाहीं.)

**भोलानाथ**—तुमची सूनबाई कुठं माई ?

**विषया**—( अंग हालवित) ती बसली आहे आंत स्वयंपाक खोलीत.

**भोलानाथ**—म्हणजे तुम्ही सर्व इथं; आणि ती एकटीच स्वयंपाक खोलीत करते काय ? माई बोलवा बोलवा पाहुं तीला· मी विचारतो·

**माई**—आगो नर्मदाबाय बाप आलाय गो.

[ हलक्या पावलाने नर्मदा येऊन दूर उभी राहते. ]

**भोलानाथ**—( नर्मदेस ) कायग चारचौघांत बसायचं बोलायचं, हासायचं ते कांही नाही बसली आपली एकल कोंडी आंत. काय करीत होतीस ?

**नर्मदा**—तांदुळ निवडत होती बाबा.

**विषया**—बाई बाई बाई कित्ती खोटं बोलते हं. (भोलानाथास) अहो हिला किनई चारचौघांत बसायलाच नको मुळी. ही काय सांगते आणि तुम्ही काय ऐकता.

**भोलानाथ**—मग कुटुंबात व्यर्थ दिली हीला. एकल कोंड्याला दिली असती तर ठीक झालं असत. ( नर्मदेस ) कायग सोन्यासारखा नवरा, आणि रत्नासारखी माणसं तुला लाभली असून, कशी ग तूं अभद्र कपाळाची ?

**माई**—तुम्ही मुलीला आमच्या पदरांत लोटलीत, आणि बसलांत थंड !




कामेश्वरः—आतां हा काळा खडक तुझ्या डोक्यांत—[ अंक २ रा पान ३० ]

**भोलानाथ—**( विस्मयानें ) म्हणजे ?

**विषया—**म्हणजे काय ? तुमच्या मुलीनं आमच्या घरांत बंड उभारलं आहे. बंड ! !

**भोलानाथ—**बंड ! बंड ते कसलं. [ कामेश्वरास ] काय हो जांवयजी, काय करते हां.

**कामे०—**( कांहीच बोलत नाही.)

**भोलानाथ—**जांवयजी, आज रागात आहेत असं वाटतं. [ माईस ] आज काय तंटा भांडण झालं का घरांत ?

**माई—**आवो, कसला टंटा, आणि कसलं भांडण. हाट्ट करते, आयके नाय. कामार मुळी चित नाय. जबाबार जबाब ते, तोंडाला तोंड, सकाळी आट आट वराती उटे नाय. आणि या विषया बायच्या नावान ओरगी दगड फोडे.

**विषया—**काय मी हिचं घोडं मारलं आहे नकळे. तरी बरं हिला कुणी नावं ठेवु नये, हासुं नये, म्हणुन मी आपलं वरचेवर सांवरित असते.

**भोलानाथ—**( आठवल्या सारखें करून) अरे हो तुझ्या ताईन, वेंगुर्ल्याहून एक पत्र पाठविले. ( खिशांतुन एक पत्र काढतो ) हे घे. नीट वाच बरं. [ पत्र देतो ]

**नर्मदा—**[ मनांत पत्र वाचतां वाचतां एकदम ओघाने ] हात्तिच्या ! माझी मी समर्थ आहे [ असें म्हणुन पत्र भोलानाथास देते ] मी खुशाल आहे असं कळवा तिला बाबा.

**भोलानाथ—**[ उठून ] ठीक उद्यांच लिहितो तीला, बरं येवु मी ?

**नर्मदा—**नीट संभाळुन जा बरं का बाबा. [ भोलानाथ जातो व नर्मदा स्वयंपाकगृहात जाते ]

**माई—**चला आपुणही जावया जरा घटकाभर म्हाळसेच्या घरी ( उठु लागते तोच कमरेत लचक भरते ) आगो बाय बाय बाय. जळ्ळीं कंबरेतली लचकच जायनाय. [ कमरेवर हात धरीत कुंथत कुंथत जाते. ]

**विषया—**[ इकडे तिकडे पाहुन कामेश्वरास ] काका, मघाच ते पत्र अवदसेनं वाचलं त्या वेळी 'माझी मी समर्थ आहे' असे उद्गार तिच्या मुखावाटे निघालेते ऐकलना तुम्ही ? मला ते पत्र बनावट दिसतं काका. [ त्याला बिलागते ]

**कामेश्वर—** [ तिच्या खांद्यावर हात टाकून ] वहिनी तुमचा तर्क अगदीं बरोबर. मला सुद्धां थोडा संशय आला त्यावेळीं. कांहिंका असेना, तीला बोलावून तुमच्या समक्षच विचारतो, म्हणजे समजेल कसलं पत्र ते !

**विषया—**आणि तिनं जर खरं सांगितलं नाही, तर काका द्या चांगला खुराक न् काय.

**कामे०—**खुराक ! खुराक असा तसा नव्हे, हंटरनं चडवीन, हंटरनं !

**विषया—**मीसुद्धां हातभार लावीन. बोलवा सटवीला बाहेर.

**कामे०—**( मोठ्याने ) चल बाहेर ये पाहूं. चल लौकर.

**नर्मदा—**[ प्र. क. ] काय पाहिजे ?

**कामे०—**( दमानें ) कांही नको अशी समोर उभी रहा. मी विचारतो त्या प्रश्नाचं सरळ उत्तर दे.

**नर्मदा—**प्रश्न ! कसला प्रश्न ?

**कामे०—**तुझ्या बापानं ते पत्र दिलं होतं ते कोणाचं !

**नर्मदा—**पत्र ! ते ते त्यांचं स्वतांःचं.

**विषया—**[ एकिकडे ] काका; वेड्याचं सोंग.

**कामे०—**त्याच स्वतः च ते आहे ठाऊक मला. पण ते पाठविलं कुणी

**नर्मदा—**कुणी म्हणजे, ताईनं.

**विषया—**( एकीकडे ) काका, बनवा बनवी.

**कामे०—**( अस्तन्या वर करून रागांत ) खरं सांग. नाहीतर बघ कशी कणीक मऊ करीन ती. सांग.

**नर्मदा—**अहो, पण भलभलते संशय कसले घेतां !

**विषया—**( एकीकडे ) काका लपंडाव !

**कामे०—**( हात करून ) सांगतेस कीं नाही, की देऊं एक श्रीमुखात भडकाऊन ?

**नर्मदा—**[ कांही एक बोलत नाही. ]

**कामे—**( संतापानें तिला चिमटे काढीत ) सांगत नाहीस, बेशरम, निर्लज्ज, पाजी, [ मारतो ] बोल. बोल लौकर.

**नर्मदा**—( रडुं लागते. )

**विषया**—[ एकीकडं ] काका, वाण्याचं रडं !

**कामे०**—रड, ओरड; वाटेल तितका कल्होळ कर. पत्र कुणाचं ते सांगितलं नाहीस, तर हलकटे तुझा जीव घेईन जीव.

पद ८ वें.

**रूदन कां करिसी, वरीवरी । गर्व परीहारा तव करूनी ।**
**ह्मणिन तुडवीन, पाय दळीं तुज ॥ रू० ॥**
**नीच कामिनी एक जगीं तूं । निर्मियली विधिने कशीतूं ॥१॥**

**नर्मदा**—( स्फुंदत स्फुंदत ) घ्या, घ्या, घ्या, एकदाचा माझा जीव, आणि व्हा मोकळे.

**कामे०**—( रागानें) चूप. वटवट करशील तर ठार करीन.

**विषया**—काका, निगरगट्ट, बाई, बाई, बाई काय बघा मेलं, जरा कुठं तुम्ही बोट लावलंत, तर केवढा फार्स केला बघा. कुणी म्हणतील कीं हिला खरंच मारलं. तो मेला थेरडा नाटक्या, आणि त्याची ही कारटी. आई तर सटवेची फुलपांखरूच होती.

**नर्मदा**—[ रडव्या स्वरात संतप्त ) खबरदार माझ्या आइबापाच्या नावाचा उद्धार कराल तर. [ हुंदके देत ] मला मारा, पुरा, चीरा, ठार करा, काय वाटेल ते करा, पण माझ्या आईबापानं तुमचं—

**विषया**—( मधेंच दांत ओंठ चावीत व ओंचा खोंचीत ) काय, काय बोललीस भोंगळे, [ वेडावून ] आईबापाचं नांव का घेतां ? अग हडळे ! थांब हं. काका, जा, स्वयंपाक खोलीतून चुलीतला एक मोठासा रखरखीतं निखारा आणा आणि या अवदसेच्या जिभेवर चांगले चरचरीत बरे चटके.

**कामे०**—[ गडबडीनें ] ठीक ठीक. वहिनी हा चाललो, पहा. अत्तां घेवुन येतो.

[ कामेश्वर जातो व विषया कमरेवर हात ठेवून व डोळे ताणून नर्मदेकडे पहात राहते.]

**नर्मदा**—[ दीन स्वरानें ] वहिनी, काय हा माझा छळ चालविला आहे तुम्ही ! [ सुस्कारे देत ] मला आई नाही. बाबांच म्हातारपण, तुमच्याशिवाय मला कुणाचा आधार बरं. तुमच्या अंतःकरणाला पाझर कसा फुटत नाही वहिनी. तीन दिवस माझ्या पोटात अन्न नाही. चहा नाही. कांही नाही. तरी पण कसा बसा जीव धरून दिवस काढीत आहे. [ हात जोडून ] वहिनी, नका, नकाहो अशा निर्दय होउं. त्यांच्या कडन आतां अग्निनं मला पोळणार ना? देवा,-

**पद ९ वें**

**तुजवीण ना जगिं आसरा । तु. ।**
**नच कोणी त्राता शिवशंकरा । तु. ।**
**मम शूद्ध भावा । तुज ठाव देवा ।**
**करूणा न कां ये । तव अंतरा । तु. ॥ १ ॥**

**विषया**—(रागाने) चूप ( वेडावुन ) डेवा, डेवा, कशाला बोबलतेस देवाच्या नावानं ? देव तुला चांगलाच ओळखुन आहे समजलीस. तुझ्या हांकेला जणू तो धांवतच येईल. सती द्रौपदीच पडलीस की नाही. 'अग सटवे; काकाकडं जराशी मी बसले, की तुझ्या अंगाची लाही होते, नाहिग टवळे !

**नर्मदा**—वहिनी, मी तुम्हां दोघांच्या आड येते तरी कधीं ? त्यांच्या हुकूमा प्रमाणं रोज मी सासुबाईच्या पुढ्यांत नाहिंका झोपत ? असं असुन माझे हाल कां बरं चालविले आहेत.

[ इतक्यांत लोखंडी चिमट्यातून विस्तवाचा निखारा घेऊन कामेश्वर येतो ]

**कामेश्वर**—हाल कां चालविले ! ये अशी मी सांगतो. कढीला फोडणी दिली की ती जशी खमंग लागते, तद्वत तुझ्या जिभेला या विस्तवाची फोडणी दिली का लगेच त्या पत्रासंबंधी खरा प्रकार चटकन् बाहेर पडेल. चल ये अशी, [ विषयेस ] वहिनी, धरा हिचे दोन्ही हात मजबूत.

[ विषया ओंचा खोंचून नर्मदेचे दोन्ही हात मागुन घट्ट धरेते, नर्मदा रडत ] देवा, मंगेशा धांवा, धांवा, बाबा आई असें म्हणून रडते. ]

**कामे**—खबरदार, त्या मंगेशाच्या, आणि आईबापाच्या नावानं कोकटलीस तर, आमच्या तावडीतून तुला आतां कोण सोडवितो ते पहातों.

**विषया**—काका, काका, आतां विलंब लावूं नका मी अगदीं घट्ट धरली आहे. द्या चांगले दोनतीन चुरचुरीत चटके.

**कामे**—( चिमटा पुढें धरून ) हे पहा विस्तवाच्या रखरखीत निखाऱ्याचे चटके तुझ्या अंगास लावण्यापूर्वी—

( असें म्हणून चिमटा नर्मदेच्या अंगापाशीं नेतांच, त्यांतील जळता निखारा चटकन विषयेच्या पायावर पडतो. विषया तळमळत चटकन खालीं बसते. )

**विषया**—( कण्हत पाय चोळते ) अग आईग, काका, मेले मेलें काय हें. निखारा माझ्या पायावर पडला काका. अग बायग, अरे देवा. ( रडुं लागते.)

**कामेश्वर**—( बसून तिचे पाय चोळतो व रुमालानें वारा घालीत ) अस कस झालं. एवढा घट्ट धरला असुन तुझ्या पायावर कसा निखारा पडला. हा काय चमत्कार. चिंता नाही. तोच निखारा पुन्हा लावतो हिच्या अंगाला. (असें म्हणून पुन्हां चिमट्यानें निखारा घेऊन नर्मदेस लावणार तोंच )

**नर्मदा**—( चटकन् ) ते पत्र तुमच्या संबंधी होतं.

**कामेश्वर**—काय माझ्या संबंधी ! म्हणजे. ( चिमटा बाजुला फेंकतो.)

**नर्मदा**—त्या पत्रात तुमचा वहिनीशी—

**कामेश्वर**—( कपाळास आठ्या घालून, हं आलं माझ्या ध्यानात.(विषयेस) समजल कां वहिनी म्हणजे तुमचं आणि माझं—

**विषया**—( अधिक संतप्त ) इश्श. जळलं मेल्याचं तोंड ते. काका, तुम्ही आतां स्वस्थ बसुं नका. त्या थेरड्याचा चांगलाच समाचार घ्या. चार पोरांची आई मी, आणि तुम्ही केवढे ! तसंच भुतलेल्या तांदळासारखा माझा नवरा असून. मेला भलभलतं पत्र लिहुन पोरटीचं मन कलुषित करतो होय.

**नर्मदा**—अहो पण तुम्ही माझ्या बाबाना शीव्या कां देता ?

**विषया**— ( रागानें ) चुप बैस कारटे, लाज नाही वाटत बोलायला ! मी काकांशी तोंडभर बोलते. म्हणुन भलतीच हाकाटी करतेस होय ? आमच्या

कुटुंबात एकमेकाबद्दल भेदभाव मुळीच नसतो, आणि ह्मणुनच आह्मी मिळुन मिसळून वागतो. ते तुझ्यानें पाहवत नाही. ( वेडावुन ) आणि ह्मणे बाबाना शीव्या कां देटा.

**कामेश्वर**—वहिनी, त्याला आता इथं यायचाच बंद केला पाहिजे.

**विषया**— हो काका. खरंच करा बंद, उद्यां रविवार ना ? जा. या भोगळीला घेवून त्या थेरड्याच्या घरी, आणि त्याला स्पष्ट सांगा की तूं आमच्या घरी येता कामा नये.

**कामेश्वर**—( नर्मदेस ) ऐकलस माझ्या बरोबर उद्यां बापाच्या घरी चल, आणि त्याच्याकडून ते पत्र घेऊन मला दे. कारण हस्ताक्षर कुणाचं आहे ते. पाहिलं पाहिजे. चल निघ येथुन. जा स्वयंपाक खोलीत जाऊन पड, चटाई घेशील तर याद राख. पहातेस काय तोंडाकडे. चल नीघ येथून. माझ्या खोलीत आलीस तर धक्का मारून घालवीन. चल, हो चालती. [ नर्मदा जाते.]

**विषया**—[ कामेश्वरास बिलगुन लडिवाळपणाने ] काका, लावाना एकदा त्या सटवीचा निकाल ! द्या घालवून घराबाहेर; म्हणजे मग आपल्याला सुखा-समाधानानं राहतां येईल. काय मेली रोजरोज कीटकीट !

**कामेश्वर**—[ तिच्या पाठीवरून हात फिरवीत ] लाडके वहिनी. मी त्याच विचारात आहे. तुमच्या शब्दाबाहेर कां मी आहे !

### पद १० वें.

**हालचाल या देहाची । साजणी तुझ्या हाती ग ।**
**देह तूंचि मी तव छाया । तूंचि सूई मी दोरा ग ।**
**तूंचि बूट मी लेस परी । आरसा मी तू फणी ग ।**
**पोळपाट तूं परि मी । गुळगुळीत लाटणी ग ।**
**मी गुलाब पाणी परि । तूं गुलाब दाणी ग ।**
**तुं सुपारी आडकीत्ता मी । शोभतो कसा जोडा ग ॥ १ ॥**

[ पडदा पडतो. ]

---

## प्रवेश ४ था.

[ **स्थळ**–ओसरी. डोळ्यांस पदर लावीत नर्मदा प्रवेश करते. ]

**नर्मदा**—[करुण स्वराने] देवा ! कायही माझी विटंबना ! आज तीन दिवस अन्नाचा कण नाही. झोपायला फाटकी चटई घेण्याचीसुद्धां मनाई ना ! दगडाच्या जमिनीवर रात्रभर झोपून अंग दुखूं लागलं. [ हुंदके देत ] बाळपणापासून माझ्या आईबापानं मला कौतुकानं वाढविलं. त्याच प्रभेचे आतां असे हाल व्हावेतना ! देवा; तुझ्या दरबारी न्यायच नाही कां ? प्रभेला चांगल्या मायस्थ अशा कुटुंबात द्या, असं वचन माझ्या आईनं अंतःकाळी माझ्या बाबाकडन् घेतलं, त्यावेळचे तिचे ते अश्रुनं भरलेले नेत्र, अजून माझ्या डोळ्यासमोर दिसत आहेत [ आकाशाकडे पाहुन ] आई, आई, नको, नको, अशा केविलवाण्या मुद्रेने माझ्याकडं पाहुं नको. [ हुंदका देवुन ] तुझी ही लाडकी प्रभा, लौकरच तुला भेटायला येइल बरं ! [ डोळे ताणून ] काय, काय म्हणतेस ? हा सारा माझ्या बाबांचा दोष ! त्यांनी नवरदेवाची कसून चौकशी केली नाहीं ! नाहीं, नाहीं. आई, हा बाबांचा दोष नाही मुळीच नाही. खरंच नाही. हा दोष बाबांचा नाही. [ हुंदका देऊन ] हा या अभागी प्रभेच्या दैवाचा खेळ ! ! वचनाची स्मृति ठेवुन हुंड्याचा भार कल्पने बाहेर बाबानी सहन केला. आणि मी सुखी होईन म्हणून मला कुटुंबात दिली. पण–पण काय. दुर्दैवानं असा पाषाण हृदयी नवरा मला लाभला. आजकालच्या नव्या काळात माझ्याहून मोठमोठ्या उपवर मुली नव्हत्या का मग माझ्याच लग्नाची घाई बाबानीं कां बरं केली नशीब माझं. उपवर मुलीनो, कुमारिकानों ? या तुमच्या दीनदुबळ्या प्रभेची दुर्दशा पहा, आणि सावध व्हा. लग्नाची घाई करून नामधारी नवऱ्याचं दावं गळ्यांत बांधून घेवूं नका.

### पद ११ वें

**कुणि नवरा असा ग नवरा ॥ कु० ॥**
**बंधुपत्नि नादें निज जाया । निर्दय होउनि छळि कैसा ।**
**देवुनि हुंडा बांधिला धोंडा । वडिलानें मम गोंळ फांसा ॥१॥**

( जाते )

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**—कामेश्वराचे घर. माई, म्हाळसा, विषया, व कामेश्वर विरोधकाची वाट पहात आहेत. पडदा उघडतो. ]

**कामेश्वर**—भाऊजीला लौकर घेऊन या असं बंडु भाऊला सांगितलं तरी पण अद्याप कुणाचाच पत्ता नाही.

**माई**—अरे येतील सावकाश.

**म्हाळसा**—ते नाही तर नाही. निदान बंडुनं तरी यायचं कीं नाही.

**विषया**—त्याचं ना ते विचारूच नका. वाटेत कुणी भेटलं. कीं लागले त्यांच्याशी बडबडायला. मग कुणी कांही करो. त्याना कांही नाही. [ पाहुन ] थांबा हां. ते कोणसं येत आहे. ( नीट पाहून ) हो. तेच वाटतं.

**कामेश्वर**—[ नीट पाहुन ] छट, भाऊ नव्हेत ते. भाऊजीचा गडी तान्या, तो [ इतक्यांत तान्या येतो त्यास ] कायरे तान्या तुझे शेट कुठं आहेत,

**तान्या**–माज काय ठावं ! खैलीकड गेलायत ते. घरांत नायबा. माज वाटलां हातं आल असतील. मी आलां वयनी बायस बगायां. म्हटलां मोप रात जाली आनी बाय कशा नाय घरां आल्या ? घरात शेट नाय आनी बायपर नाय, होय.

**कामेश्वर**—( पाहुन ) हे येताहेत पहा.

[ बंडोबासह विरोधक येतो, कामेश्वर त्यांना खुर्ची बसावयास देतो. तान्या बाहेर जातो ]

**विरोधक**—( छाती काढून ) रोज रोज घरांत काय हें धूमशान. कामेश्वर काय म्हणते रे तुझी वाईफ ? ती जर मुळी ऐकत नसेल, तर एकवार काय तो सोक्षमोक्ष कर. उगाच रात्रादिवस भांडण कशाला.

**कामे०**--सकाळपासून तिच्या अंगांत आलं आहे भाऊजी. वहिनीला अचकट विचकट कांही तरी बोलते वहिनी म्हणजे जणूं उकिरड्या वरचा कचरा.

**विरोधक**–कां? विषया बाईच्या नावानं एवढी जळफळते कां? कायहो माई ?

**माई**–[त्रासल्यासारखे करून] माला काय समजे नाय. विषयाबायलाच विचारा.

**म्हाळसा**—विचारा. काय कम मागं कामुला लागलं होतं वेड, त्यावेळी विषयाबाईच उपयोगी पडली ना ! नर्मदेला काय ठाऊक फत्रे !

**विरोधक**—नाही पण आज एवढं विकोपाला जायचं कारण काय !

**विषया**—कारण कसलं तिचं म्हणणं कीं, मी काकाशी मुळी बोलूच नये. उगीच भलभलते संशय घेऊन घरात कलागती माजविते, मी जीवेभावे काकांची तयनात राखते, ते तीला सहन होत नसल्यामुळं माझ्यावर दांत ओंठ खाते. [ डोळे पुसीत रडव्या स्वरांत ] आणि काय सांगु भाऊजी मला ती मर्यादेबाहेर बोलूं नये ते बोलते.

**विरोधक**—कामेश्वर, इट इझ नाव टू ओव्हर ! सेंडहर टु हर फादर ! जाऊं दे बापाकडे. आतां तिला इथं ठेवणच बरं नव्हे. बोलव पाहुं तिला.

**कामेश्वर**—( पडद्याकडे पाहून ) आलीस का बाहेर. चल लौकर.

[ नर्मदा प्रवेश करून खाली मान घालुन उभी राहते. ]

**विरोधक**—[ ऐटीत ] कायग, काय चालविलं आहेस तूं या घरात ?

**नर्मदा**—[ कांहीच बोलत नाही ]

**विरोधक**—तोंड नाही का तुला बोलायला. तुझ्या मानेवर कोण बसलं आहे ? कुठला खविस !

**नर्मदा**—( कांहीच बोलत नाही )

**विरोधक**—बोलतेस कीं, नाही. कायग, तुं मला या मंडळी प्रमाणं समजु नकोस, मी संतापलो तर तुझा निकाल लावीन, समजलीस. माझा लष्करी बाणा आहे लष्करी.

**नर्मदा**—(कांहीच बोलत नाही. )

**कामे०**—किती निर्लज्ज पहा. भाऊजी एक सारखे विचारतात तरी हुं की चुं करीत नाही.

**माई**—आगो नर्मदाबाय. बोल नागो. वाचा धरली तुझी ? शी बाये. ( हात जोडुन ) शर्त झाली तुझ्यापुढें.

**नर्मदा**—( कांहीच बोलत नाही )

**विषया**—अहो पण तुम्ही कां घसा दुखवितां माई. तीला आतां उभी चिरली तरी बोलायची नाही. वेड्याचं सोंग घेतलं आहे तिनं.

**विरोधक**—ठीक. नाहिना बोलायचं ?

**नर्मदा**—( कांहीच बोलत नाही ).

**विषया**—ती बापाच्या जिवावर उडते. मला बापाकडं पाठवा, अशी काकांच्या मागं टकळी चालविली आहे.

**म्हाळसा**—मग जाइना जाते तर बापाकडं. चार दिवस इकडं शांतता तरी राहील.

**कामे०**—चार दिवस कां. जन्माचीच जाइना परती. मला हिची मुळींच जरूरी नाही. स्त्रियांचें आद्यकर्तव्य म्हणजे पतिसेवा, पण लग्न झाल्यापासुन हिनं माझं काय केलं.

**विषया**—बरं आपण करायचं नाही, आणि दुसऱ्यानं केलेलं पाहावयाचं नाही.

**बंडोबा**—म्हणजे आमच्या घरीं जेऊं नको, न तुमच्या घरी जेऊं नको. आणि मधे उपाशी राहूं नको. सबसे बडी चूप.

**म्हाळसा**—( विरोधकास ) चला पाहुं उठा. चला घरी. काय मेला त्रास हा रोज रोज आमच्या मागं. आमचं आम्हाला थोडं, आणि व्याह्यानं धाडलं घोडं. चला.

**विरोधक**—[ उठुन ] बरं माई येतो मी, हें चिन्ह कांही ठीक दिसत नाही. [ कामेश्वराला एके बाजूला यावयास खुणावतो ] हें पहा. आतां मात्र वेळ काढुं नकोस. आमच्या तान्याला बरोबर घेऊन जा, मात्र त्या म्हातान्याला तूं समक्ष भेटुं नकोस. तिला तान्या बरोबर माडीवर पाठीव. आणि कां पाठविली असं जर विचारलं, तर ती फारच हट्ट करूं लागली म्हणून आणावी लागली, असं सांगायला तान्याला सांगुन ठेव. बरं येतो.

[ म्हाळसा व विरोधक जातात. ]

**माई**—( कमरेवर हात धरून हळु हळु उठते ) बंडु चल बाबा झोंपायला. अकरा वाजले यांची आज कत्तलची रात हाय. यांना हवा तितका गोंधळ घालुं दे चल.

**बंडोबा**—[ जांभई देत ] हो, हो. चला माई. मला त्याचं कांही नाहीं.

[ माई व बंडोबा जातात ]

**कामे०**—( मोठ्यानें ) तान्या, ये तान्या.

**तान्या**—[ प्र. क. ] जी.

**कामे०**—त्या खोलीत जा. आणि हिची ट्रंक घेवुन ये बाहेर.

[ तान्या जातो व ट्रंक घेवून येतो ]

**कामे०**—( नर्मदेस ) चल आटप लौकर. तुझं जुनं पातळ आणि फाटका ब्लावझ घे आणि घाल त्या ट्रंकेंत. अकरा वाजून गेले. वेळ काढुं नको. चल.

**नर्मदा**—( खोल स्वरात ) मला इथं पुन्हाः आणायचं नसलं तर माझं सर्व सामान द्या. एकच पातळ आणि फाटका ब्लावझ कशाला.

**कामे०**—( तुझं इकडे कांही नाही. उगीच वटवट करूं नकोस.

**नर्मदा**—कांही नाही म्हणजे. दागिने, वस्त्रप्रावणें कांहीच कां नाहीत ?

**कामे०**—( रागानें ) एकवार सांगितलं ना नाही म्हणून. मग व्यर्थ बडबड कां करतेस.

**नर्मदा**—ठीक. तर मग पुन्हाः मी नको ना येऊं इथं.

**कामे०**—नको, बिलकुल नको. मुळीच नको, अजिबात नको. यापुढं तुझा मला संबंध नको. ( ट्रंक लाथेने झुगारून ) चल घाल यांत तुझं ते पातळ आणि ब्लावझ, आणि चल हो चालतां.

**नर्मदा**—( ट्रंकेंत पातळ व ब्लावझ घालुन डोळ्यांत आसवें आणते ) माझा संबंध तुटला व सोन्याचा भाव वाढला.

**विषया**—( रागानें ) काय, काय म्हणालीस ? काका समजलाना याचा अर्थ तुम्हाला, अवदसेला दाखवा चांगलं शंभर नंबरी सोनं !

**कामेश्वर**—बेशरम. काय बोललीस ? सोन्याचा भाव वाढला. ( मारतो) काय काय चल आटप लौकर. ( तान्यास ) तान्या उचल ही ट्रंक; आणि बाहेर गाडीत नेऊन ठेव. चल उचल. [ तान्या ट्रंक घेऊन जातो ]

**विषया**—(पदर खोंचीत व दांत ओंठ चावीत ) अग भोंगळे, सोन्याचा भाव वाढला कां ? ठीक, दाखविते तुला सोनं हं. थांब, अग मी पटवर्धनाचं आणि चिंतु छापवाल्याचं, दोघांचहि पाहिलं आहे बरं, ये अशी.

( तिला मारूं लागते व चिमटे काढते. नर्मदा रडुं लागते )

माझ्या नवऱ्याला पुळचट समजतेस होय. माझा नवरा तुझ्यासारख्या दहा जणाना पुरून उरेल. काय समजतेस तूं.

**नर्मदा**—( रडक्या स्वरांत ) तुमच्या नवऱ्याला मी कां दोष देऊं. माझ्या नवऱ्याला—

**विषया**—[ मधेच ] अग चल. ( वेडाऊन ) " माज्या नवरा " लाज नाही वाटत म्हणायला माझा नवरा. ( वेडाऊन ) म्हणे " माज्या नवरा" नवऱ्यावर कितिशी माया आहे. ती आहे ठाऊक मला. काका तुझी पर्वा करतात कुठं ! त्यांना तर तुझा वीटच आला आहे.

**नर्मदा**— हो. वहिनी खरंच त्याना माझा वीट आला, आणि म्हणून—

**पद १२ वें.**

त्यागुनियां निज भार्येला या ।
अंकित कां परजाया । झाला । अं. ॥
आसुरि लीला । । लाजवि शीला ।
केविं पाहि नारी डोळा या । अं. ।
सेवि सुखाला । नादि जगाला ।
दावोनी गृह लीला या । अं. ॥ १ ॥

**विषया**—( त्वेषाने ) ऐका. काका, ऐका. कसं कुचकट बोलते तें ऐका. पहाता काय जातां जातां अवदसेवर शेवटचा प्रयोग करा. अहो असं पाहाता काय ( ओंचा खोचीत ) मी सुद्धां करते मदत. " आसुरी लीला " काय अग टवळे ( तिची गर्दन धरून ) तुझ्यावर आतां मी आसुरीलीलेचा शेवटचा प्रयोग करते बरं. ये. ( नर्मदेस मारूं लागते ).

( एका बाजुनें विषया व एका बाजुनें कामेश्वर नर्मदेस धरून मारूं लागतात, नर्मदा ओक्साबोक्सी रडूं लागते. आरडाओरड होते, व ती ओरड ऐकून बंडोबा जागा होतो व डोळे पुसीत बाहेर येतो.

**बंडोबा**-[ ते दृश्य पाहुन गागरतो व मोठ्याने ओरडतो.] अग अग काय हे !

[ मारामारी सोडविण्यास बंडोबा प्रयत्न करतो तो चुकून विषयेचा रपाटा त्याच्या मस्तकावर बसतो व बंडोबा अरे बापरे म्हणून ओरडतो व खाली पडतो. ]

[ पडदा पडतो. ]

**— अंक दुसरा समाप्त.—**

# अंक ३ रा.

## प्रवेश १ ला.

(**स्थळः**—भोलानाथचे घर—प्रभा व भोलानाथ बोलत बसले आहेत. पडदा उघडतो.)

**भोलानाथ**—मररात्री अकरा वाजतां तुझ्या नवऱ्यानं तुला इथं आणून सोडली आणि मला न भेटतां तसाच चालता झाला. त्याचं कारण काय ? प्रभे, काय झालं सांग पाहूं. असे अश्रु ढाळूं नकोस.

**प्रभा**—( दीन स्वरांत ) बाबा, काय सांगुं मी आपल्याला. त्यांच्या स्वैर वर्तनाचे पोवाडे, आपणापुढं कशी मी गाऊं ! त्यांच्या म्हणण्याला मी होकार दिला नाहीं, म्हणून मला घराबाहेर काढणं झालं.

**भोलानाथ**—कसलं म्हणणं, आणि कसला होकार ! प्रभे, असं संदिग्ध का बोलतेस, भिवूं नकोस, खरं सांग. लाजूं नकोस. खऱ्या गोष्टीला लाज कसली.

**प्रभा**—तुमचा आग्रहच आहे तर सांगते, काल सकाळीं नेहमी प्रमाणं माई, वंडुभाऊ बरोबर चौपाटीवर गेल्या. त्यानंतर आमच्या स्वारीनं आपल्या खोलीतून बाहेर येवुन मला जागं केलं.

**भोलानाथ**—( आश्चर्यानें ) काय, तुझ्या नवऱ्यानं. खोलीबाहेर येऊन तुला जागं केलं ? म्हणजे तूं कुठं झोपतेस ?

**प्रभा**—( लज्जीत ) सासुबाईच्या पुढ्यांत.

**भोलानाथ**—( विचार करून ) अस्सं. बरं पुढं !

**प्रभा**—नंतर मी स्वैयंपाक गृहांत जाऊन चहा तयार केला, व बाहेर आले तोच वहिनी आणि ते माझ्याकडं पाहुन रागानं गुरगुरायला लागले. त्या काळ-म्मानं तर कानानीं ऐकूं नये व मुखानीं उच्चारूं नये, अशा अचकट विचकट शिव्या मला दिल्या.

**भोलानाथ**—ते कां ? तुझ्यावर एकाएकी अशी आग पाखडण्याचं कारण तरी काय ! तूं काय केलस !

**प्रभा**—मी काय करणार बाबा ! देवा, तुलारे डोळे, असं म्हणून स्तंभीत झाले.

**भोलानाथ**—( मान हालवित ) समजलों, समजलो. आलं माझ्या ध्यानांत. त्यांच्या म्हणण्याला, तुझ्या कडनं होकार मिळाला नाहीं; म्हणून तुझ्यावर शिव्याचा तोफखाना चालु झाला, असंच ना ?

**प्रभा**—हो, पण बाबा, आतां पुढं कसं ! तुम्ही काय कराल ?

**भोलानाथ**—परमेश्वर जशी मला बुद्धी देइल, तसं करीन. त्या विषयेची सर्व बिंगें जगाच्या नजरेला आणून तिच्या जन्माचा चिवडा करीन.

**प्रभा**—हात्तिच्या, निःसंग बायको ती. तीला त्याचं कांहींच वाटायचं नाहीं. शिवाय विरोधक बापुराव अमरनाथ या सर्वांचा तिला पाठींबा.

**भोलानाथ**—त्या सोनेरी टोळीला मी चांगलाच ओळखतो, विरोधकाचा लष्करी बाणा त्या डॉक्टरानें पाडला उताणा ! आणि तो अमरनाथ तर ऑर्थर-रोडची तीन महिन्याची यात्रा संपवून अमर झाला आहे. असो. मला त्यांच्याशी काय कर्तव्य. माझा संबंध फक्त जांवयाशी; त्याला भेटुन दोन बोधाचे त्रळसे देवून पाहतो.

**प्रभा**—तुमचे प्रयत्न निष्फळ होतील बाबा. त्या काळीच्या प्रेमाचा लोप, त्यांच्या कडून प्राणांति घडला जाणार नाही. असो, छंदी फंदी माणसांना बोधामृताची काय गोडी असणार !

पद १३ वें

**स्वैर मनी न सुपथा थारा । आदर कुविचारा ॥ स्वै. ॥**
**बोध हिताचा बहु मोलाचा । विषसम गमत तया सारा ॥**
**लोलुप अविकारा ॥ स्वै. ॥ १ ॥**

**भोलानाथ**—तूं म्हणतेस तें खरं, परंतु प्रयत्न करणं हे माझं कर्तव्य. तो विरोधक मॉर्निंगवाकला चौपाटीवर येत असतो तेव्हां त्याला भेटुन खटपट करुन पाहतों. वळलं तर ठीक.

[ पडदा पडतो. ]

———

# प्रवेश २ रा.

( स्थळ—चौपाटी. पूर्ववत् फेरीवाले ओरडत. फिरतात, नंतर कव्हर उघडतो, वाळवंटावर, विरोधक, दादासाहेब, माई, म्हाळसा, व बंडोबा गप्पा मारीत बसलेले आहेत असा देखावा. )

**विरोधक**—नर्मदेच्या त्रासातून कामेश्वर मुक्त झाला एकदाचा. रात्रंदिवस घरांत तिची कीट कीट असायची. काय सांगु दादासाहेब तुम्हाला. नर्मदेत कवडीचा अर्थ नव्हता. वडिल माणसांची तिला किंमतच नव्हती. बरं नवऱ्या-कडं तरी चांगल्या रितीनं वागायचं तेहि नाही.

**माई**—बरं, कामा काजाची तरी! ते तर मुळीच नाय. सगळा मेला भंदावडा चुलीत ही ही कोळशाची रास. आवो नारळ किसला तर ही ही सोय. भात जशी काय पोष्टाची लया सवळ्या ववळ्याचा तर गंधच नाय. किती सांगा, किती शिकवा पण आयकाचं म्हणून नाय. बरं बोलावलं तर नाकार राग. तोंडाला तोंड आणि विषयाबायच्या नावाचा संचार!

**म्हाळसा**—माई, तो तिचा बाप आमच्या घरी आला की पोरीच्या गुणाचे पोवाडे किती गातो पण.

**बंडोबा**—भाऊजी. परवां किनइ कामुला नर्मदा माझ्या समक्ष तडातडा बोलत होती हो. आमचीच्या वरून कशी बोलली, म्हणे माझ्या पेक्षां वहिनीचेच बोल तुम्हाला खरे वाटतात. मी म्हणजे कुणीच नाही. माझ्याशीं लग्न तरी कां केलं. माझ्या बापाला जड झाले नव्हते मी. दिली असती मला एखाद्या गरिबाला, असल्या नवऱ्याची बायको होण्यापेक्षां मरण आलेलं काय वाईट? असं म्हणाली हो. मी वडील दीर तिथं उभा, पण माझीसुद्धां पर्वा केली नाही तिनं हो. ( डुलुं लागतो. )

**म्हाळसा**—हें सगळं तुझ्या समक्ष बोलली नारे बाबा!

**बंडोबा**—हो ताई, खरंच. माझ्या समक्ष बोलली. तुझी शपथ.

**विरोधक**—त्यावेळीं तुम्ही स्वस्थ कसे बसलांत. चांगल दाखवायचं होतं कीं नाही!

**बंडोबा**—( मानेस हिसडे देत ) वाः वाः मी काय दाखविणार! मला त्याचं कांही नाही.

**माई**—बरं केलंस बाबा गप्प बसलास तो. नाही तर ही गोष्ट चार तोंडी झाली असती आणि फजितीला पारावार राहिला नसता.

**बंडोबा**—बरं माई चला जाऊं घरी. ती एकटी आहेना. एकट्या हातानं जेवण कसं होईल.

**माई**—कसली एकटी, कामु आहेना घरांत. तो तिला हातभार लावील. तो पाणी भरतो, कातुन देतो, वाटून देतो, तिला जे पाहिजे ते करतो. तूं कांही काळजी करू नको हा.

**बंडोबा**—छे, छे, काळजी कसली माई. ती दोघं काय वाटेल ते करीनात. मला त्याचं कांही नाही.

**दादासाहेब**–अगदी बरोबर बोललांत बंडोबा. आपण तिथं लक्षच देवुं नये.

**विरोधक**–बरं चला उठा पाहूं, जा, आतां घरी. मी एक राऊंड मारुन येतो.

( सर्व उठुन जाऊं लागतात. विरोधक राऊंड घेतो. कव्हर पडतो.)

[ चौपाटीवर मॉर्निंग वाकला आलेला भोलानाथ विरोधकास भेटतो. ]

**भोलानाथ**—गुड मॉर्निंग.

**विरोधक**— ( कपाळास आठ्या घालून ) गुड मॉर्निंग .

**भोलानाथ**—त्या दिवशी जावयजीनं प्रभेला रात्री अकरा वाजतां माझ्या घराकडं आणून सोडली आणि मला न भेटतां निघून गेले. नंतर पांच सहा दिवस मी त्यांची वाट पाहिली. शेवटी मला भेटायला या असा त्यांच्या ऑफिसांत मी फोन केला. तर म्हणे भाऊजींच्या हुकूमाशिवाय मी यायचा नाही. तेव्हां कृपा करून आपण त्याना माझ्या घरी पाठवाल तर मोठे उपकार होतील. म्हणजे मी सर्व गोष्टीचा खुलासा करेन.

**विरोधक**—कसला करता खुलासा ! भोलानाथ झालं ते ठीक झालं तुमच्या जावयाच आता या पुढं तीच्याशी पटण कठीण. त्याला आता तिची मुळींच जरूरी नाही.

**भोलानाथ**—( आश्चर्याने ) म्हणजे ! असं तिने केलं तरी काय ?

**विरोधक**—ते कांही मला विचारूं नका

**भोलानाथ**—पण तुम्ही त्यांचे पुढारी ना ? त्यांची सर्व मदार तुमच्यावर. तुम्ही कराल ते प्रमाण. म्हणून म्हणतो दोन गोष्टी सांगुन त्यांची समजूत करा.

**विरोधक**—छे, छे. छे, उगाच वायफळ बडबडण्यांत कांही अर्थ नाहीं.

**भोलानाथ**—( विनयानें ) अहो पण ती तुमच्या मुलीसारखी. तुमच्या शिवाय माये ममतेचं तिला कोण आहे बरं. मी असुन नसून सारखाच.

**विरोधक**—हें पहा, भोलानाथ. आजपर्यंत पांच सहा महिने आम्ही पुष्कळ प्रयत्न करुन पाहिलें. पण व्यर्थ. तेव्हा आतां तिच्याशीं आम्हाला कांहींच कर्तव्य नाही.

**भोलानाथ**—तर मग आतां यापुढं तिला नवऱ्याचं घर वर्ज म्हणायचं.

**विरोधक**—यांत काय संशय.

**भोलानाथ**—मग अगं जर करायचं होतं, तर या गरिबाच्या मुलीच्या जन्माच मातेर कां बरं केलत.

**विरोधक**—तिच्या जन्माचं मातेरं कसलं, उलट आमच्या जन्माचं पोतेर झालं.

**भोलानाथ**—असा तिनं गुन्हाः तरी काय केला ? ती काय चोरटी, भामटी, भटकी, चहाडखोर, भांडखोर होती, की वाईट चालीची होती ?

**विरोधक**-छि, छे, तशी ती मुळींच नव्हती. सकाळच्या प्रहरीं खोटं कशाला बोलूं ! थोडक्यांत सांगायचं म्हणजे ती संसाराच्या कामाला अगदीं नालायक. नवऱ्याची किंमतच नाही. सासुच्या तोडाला तोंड. आणि त्या विषया बाईच्या नांवाचा जळफळाट. अहो एकदां त्या माई माझ्या घरीं आल्या आणि काय सांगु तुम्हाला, ढळढळा रडूं लागल्या.

**भोलानाथ**—कां ?

**विरोधक**—मला आतां वेळ नाही तुमच्याशी बोलायला. जातो मी.

[ विरोधक जाऊ लागतो त्याच्या पाठोपाठ भोलानाथ जाऊन त्यास अडवितो ]

**भोलानाथ**—मग पाठवाल ना जांवयजी ना ?

**विरोधक**—नाही.

**भोला०**—कां ?

**विरो०**—( चिडून ) कां ते विचारू नका. नर्मदेला घराबाहेर काढायला मी लावलं ! मग पुढं काय तुमचं म्हणणं आहे बोला !

**भोला०**—( विस्मयानें ) काय ! माझ्या प्रभेला घराबाहेर काढायला तुम्ही लावलत ? विरोधक भाई, अहो तुम्ही लावलत ! काय हो तुम्ही लावलत ! ( कपाळावर हात मारून ) काय ऐकतो मी हें !

**विरोधक**—( छाती काढून ) हो, हो. मी लावलं, मी लावलं, इतकंच नव्हे तर जर कां हे प्रकर्ण कोर्टांत गेलं तर लागेल तितक्या पैशाची मदत मी करीन असं कामेश्वराला आश्वासन दिलं.

**भोला०**—माझ्या जांवयाला अशा प्रकारचं उत्तेजन द्यायचं हे आपल्याला योग्य वाटतं कां विरोधकजी. विचार करा, विचार करा. जो प्रसंग आज माझ्यावर आला आहे, तोच जर तुमच्यावर आला असता, तर तुम्हाला काय बरं वाटलं असतं. तुमच्या पदरी जी तिला मी घातली ते तुम्ही तिला बापाच्या ठिकाणी म्हणुनच ना ?

**विरोधक**—हा तुमचा वेदांत पुरे करा. मला तुमचं कांही एक ऐकायचं नाही. तुम्हाला जे करायचं असेल ते खुशाल करा, आम्हाला करायचं ते आम्ही करूं. माझा लष्करीबाणा ! ( छाती काढून ऐटींत निघुन जातो )

**भोला०**—(द्वेषाने ) केवढा नीच पाषाणहृदयी मांग हा ! दगडाला पाझर फुटेल, परंतु या हरामखोराच्या अंतःकरणाला कधिही फुटायचा नाही. पैशाची मदत करणार काय ! वाहवारे, पैशेवाला सावकार ! म्हणे लष्करीबाणा ! ठीक पहातो तुझा लष्करी बाणा ! (जातो.)

[ अमर व कामेश्वर बोलत बोलत येतात ]

**कामे०**—अमर, मी बाईफला भोलानाथच्या घरी पोचविली, आणि स्वतः त्याला भेटलो नाही. ते इंलिगल झालं असं परवां बापुराव म्हणाले, तेव्हां आतां पुढं करायचं कसं !

**अमर०**—पुढं कसं करायचं. ते माझ्या ताईला विचार. मला कळत नाही बुवा. माझी ताई तुला सोळा आणे युक्ति सांगेल.

**कामे०**—अरे वहिनीचा सल्ला तर मी केव्हांच घेतला.

**अमर**—मग तीनं काय सांगितलं.

**कामे०**—त्या म्हणाल्या. अमर तात्याला घेवुन एक दिवशीं रात्रौ त्या म्हाताऱ्याच्या घरी जा. आपल्याला पाहिल्याबरोबर तो थेरडा चकित होईल. नंतर वाईफला मी घेवुन जाणार असं त्याला सांगायचं. आणि नंतर नर्मदेला फुसलावून तिचं मन वळवायच. नर्मदा आमच्या घरी आली, की नंतर दोन तीन दिवसांनी कांही तरी कुरापत काढून पुन्हाः तिच्या बापाच्या घरी तिचं पार्सल पाठवायचं पण ते कसं!

**अमर०**— हो, मी तेच विचारणार होतो. ते कसं बुवा.

**कामे०**—कसं म्हणजे, कांही तरी निमित्तानं त्या थेरड्याला आमच्या घरी बोलवायच आणि चार दिवस नर्मदेला माहेरी ठेवा. असं सांगुन त्याच्याबरोबर तिची रवानगी करायची. नंतर बापच तिला घेऊन गेला अशी उलट बोंब करायची का आहे की नाही डोकं आमच्या वहिनीचं. मग कसं होणार इलिगल.

**अमर०**—होरे हो, ही युक्ति अगदी बेमालुम आहे बुवा. मग आतां विलंब कशाला. तिला जाऊन आजच महिना झालाना.

**कामे०**—हो आजच महिना झाला. चल तर जाऊं त्या म्हाताऱ्याच्या घरीं मी अगदी अपटु डेट पोशाख करतो.

**अमर०**— हो हो. चल तर जाऊं या. ( दोघे जातात )

---

## प्रवेश ३ रा.

( **स्थळ**—भोलानाथाचें घर, वेळ रात्रौ १० वाजण्याची.

( प्रभा गादीवर पडलेली असून भोलानाथ खुर्चीवर बसले आहेत असा देखावा पडदा उघडतो. )

**प्रभा**—बाबा झोंपा आतां, दहा वाजले सकाळी चौपाटीवर जायचं आहे ना तुम्हाला, मग वाचीत काय बसलांत !

**भोलानाथ**—तूं झोंप. मी केव्हांही झोंपलों, तरी पांचाला जागा व्हायचा.

**प्रभा**—आज ते तुमच्या ऑफिसांत आले, त्या वेळीं काय म्हणाले ?

**भोलानाथ**—म्हणणार काय. तुझ्या नवऱ्याचं ते थापाथापीचं भाषण ऐकुन हा कुणीतरी चार्ली चापलीन किंवा झिगोमार असावा असं मला वाटलं. काय त्याची ती बोलण्याची ऐट, म्हणे वाईफला मी लौकरच घेऊन जाईन.

**प्रभा**—( स्मित हास्याने ) तुम्ही त्यांना चहा वगैरे देऊन त्यांचा पाहुणचार केलाच असाल.

**भोला०**—वाः काय भलताच प्रश्न करतेस प्रभे, अग चहाच काय, त्याला मी दुध आणि पेटिट बिसकिटे दिलीं तो माझा जांवई ना ?

**प्रभा**—छान केलंत बाबा. तुम्हाला घरीं येण्याची बंदी केली आणि मला घराबाहेर काढला, म्हणून नागोबाला दुध पाजलत होयना ?

**भोला०**—खुळी आहेस तूं प्रभे. अग तसं म्हणशील तर तो अगदीं अल्लड आहे. त्याला स्वतःचं शहाणपण मुळीच नाहीं. त्याची ती काळी मैना जशी नाचविते तसा तो नाचतो. आणि ढोलकं बडविणारा तो विरोधक.

( इतक्यांत दरवाज्यावर थाप ऐकूं येते ). ( उठुन ) कोण आलं एवढ्या रात्रीं. (दरवाजा उघडतो ) ( अपटुडेट पोषाख केलेला असा कामेश्वर येतो त्यास पाहुन प्रभा खाली मान घालुन गादीवर बसते. )

**भोला०**—या. बसा, एवढ्या रात्रीं आलात. एरव्हीच ना ?

**कामे०**—( ऐटींत ) सिनेमाला जायचं आहे. शेवटच्या शोला.

**भोला०**—कोणत्या सिनेमाला ?

**कामे०**—भडकलेला संसार !

**भोला०**—हो, सध्यां इम्पीरियलमध्ये चालुं आहे, " भडकलेला संसार "

**कामे०**—मला वाइफशी प्रायव्हेट बोलायचं आहे.

**भोला०**—हो, हो, बोला. खुशाल बोला,

**कामे०**—पण खाली ओटीवर अमरनाथ बसला आहे.

**भोला०**—अमरनाथ ! तो कोण ?

**कामे०**—आमच्या वहिनींचा भाऊ.

**भोला०**—मग ते खाली कां बसले. वर कां नाहीं आले, थांबा हा त्याना वर घेऊन येतो.

**कामे०**—नको, नको, बाबा, तुम्हीच जा खालीं. त्यांच्याशीं बोलत बसा. तोपर्यंत मला इच्याशीं कांहीं बोलायचं आहे.

**भोला०**—ठीक. तर मग मीच जातों खाली. ( जातो )

( भोलानाथ गेल्यावर कामेश्वर दरवाजा लाऊन घेतो, व बराच वेळपर्यंत प्रभेकडे पहात बसतो. प्रभा खाली मान घालुन स्तब्ध बसते.)

**कामे०**--बोलायचं नाही वाटतं ?

**प्रभा**—( खाली मान घालून स्तब्ध बसते. )

**कामे०**—मी काय विचारलं, ते ऐकुं आलं !

**प्रभा०**—( स्तब्ध बसते. )

**कामे०**—नसेल बोलायचं तर जातों मी.

**प्रभा**—( खालच्याच मानेनं हळुच ) बोलायचं काय ?

**कामे०**—माझ्याकडं पहात कां नाहीस ? लाज वाटते. घरी यायचं की नाही ?

**प्रभा**—( खालच्या मानेनें ) मी काय सांगु.

**कामे०**—बरं इकडं पहा. [ प्रभा कामेश्वराकडे पहाते ] तुला मी वहिनी संबंधी जो प्रश्न विचारला, त्याविषयी बाबाना सांगितलं नाहीस ना ? ·

**प्रभा**—छे, नाही.

**कामे०**—घे शपथ. नाही सांगितलं म्हणून.

**प्रभा**—मी शपथ घेत नसते.

**कामे०**—तर मग तूं सांगितलच असशील.

**प्रभा**—तसं म्हणा हवं तर.

**कामेश्वर**—मग शपथ कां घेत नाहीस.

**प्रभा**—लग्नाच्या वेळी शपथा, आणा सर्व कांही झाल्या आहेत.

**कामे०**—( रागानें) पुरे कर तुझा शहाणपणा. घरी येणार कीं नाही बोल.

**प्रभा**—[ स्तब्ध बसते ]

**कामे०**—अग तूं बोलतेस की जाऊं मी घरी ? येणार ना ?

**प्रभा**—माझं वहिनीशी पटायचं नाही, आणि म्हणूनच त्या घरांत मला यायचं नाही.

**कामे०**—म्हणजे ! मी वेगळं व्हाव, असं कां तुझ म्हणणं !

**प्रभा**—तुम्हाला मी हवी असेन तर वेगळे व्हा नाहीतर इथं रहा. बाबांच घर कांही परक नव्हे.

**कामे०**—इथं राहणं माझ्याकडून प्राणांतिक घडणार नाही. तुला तिथं आलच पाहिजे बोल येणार किंवा नाही.

**प्रभा**—नाही.

**कामे०**—( रागाने ) काय ? नाही येणार ?

**प्रभा**—मुळीच नाही.

**कामे०**—वहिनीच्या नावाचा तुला इतका कां तिटकारा ?

**प्रभा**—त्याचा विचार तुह्मीच करा.

**कामे०**—[ उठुन ] ठीक. तरमग मी जातो. तुला यायचं नाही ना ?

**प्रभा०**—अहं ! नाही.

**कामे०**—पुन्हा: तुझं मी तोंड पहाणार नाही लक्षांत ठेव.

**प्रभा०**—ठेवलं लक्षांत केव्हांच.

**कामे०**—[ रागाने दरबाजा उघडुन मोठ्याने ] बाबा, बाबा, बाबा, [ हांका मारतो ] [ इतक्यांत अमरनाथासह भोलानाथ येतो ]

**भोलानाथ**—[ कामेश्वरास ] झाल्या कां तुमच्या गोष्टी. ( अमरनाथास ) बसा मिस्टर. (अमरनाथ बसतो ) कां जांवयजी असे गप्प कां ?

**कामे०**—ही सांगते की, मी मुळींच घरी येणार नाही.

**भोलानाथ**—कां ? कारण.

**कामे०**—वहिनीचं आणि आपलं पटणार नाही म्हणे.

**अमरनाथ**—बरं कामेश्वर, तुला मी एक विचारतो खरं सांगशिल कां.

**कामे०**— मी खोटं कधी बोलत नसतो.

**अमरनाथ**—ते आहे ठाऊक मला. पण याना तूं इथं आणलस त्या दिवशी कांही पांचट प्रश्न याना विचारला होतास का ?

**कामे०**—[ घोंटाळुन ] कोणी मी ? आणि पांचट प्रश्न ? तो कोणता बुवा ?

**अमर०**—[ कपाळास आठ्या घालुन ] कोणता ! माझ्या ताई संबंधी विचारलास ना ?

**कामे०**—हे काय बुवा लचांड ! मी प्रश्न विचारला ! छट् फॉल्स ! !

**अमर०**—हे पहा कुलदैवत मंगेशाला स्मरून खरं बोल, खोटं बोलू नको. खरं सांगशील, तर तुझ्या अपराधाबद्दल मी यांची क्षमा मागतो.

कामे०–( स्तब्ध होतो )

अमर०–कां बोलत का नाहीस ! तूं प्रश्न विचारलास खरं ना ?

कामे०—[ होकारार्थी मान हालवितो ]

अमरनाथ—बस. पुरे. अरे अरे अरे कामेश्वर ! कमाल केलीस ! तुला काय ह्मणावं हेंच मला कळत नाही.[भोलानाथास] आपण सांगितलं तें खरं.

भोलानाथ—तुमचा विशेष आग्रह पडला म्हणून सांगावं लागल.

अमरनाथ––भोलानाथजी आपण माझ्या वडिला प्रमाण आहात. झालं ते झालं असल्या गोष्टी तुम्ही मनावर घेवुं नका. ( प्रभेस ) नर्मदाताई तुमचा मी भाऊ आहे. यानी जो तुमच्याशी मुर्खपणा केला त्याबद्दल (टोपी काडुन नर्मदेचे पाय धरतो ) मला क्षमा करा.

भोला०–(अमरनाथास उठवुन) छे, छे, छे, अमरनाथ हे काय खुळ्या सारख.

अमरनाथ—( प्रभेस ) नर्मदाताई, आता या पुढं तुम्ही मुळीच भय बाळगुं नका. त्या घरांत, तुमच्या केसालाहि धक्का लागायचा नाहीं. ती जबाबदारी माझ्या शिरा ! माझ्यावर विश्वास ठेवा. आजपर्यंत जें झालं ते विसरा. आणि उभयतानं एकमेकाशीं प्रामाणिकपणें वागा, तुम्हाला तिथं न्यायला उद्यां रात्री याचवेळीं आम्ही येऊं, तयारीनें रहा.

प्रभा—( स्तब्ध बसते )

अमर०—कां, ताई बोलत कां नाही. माझ्यावर विश्वास ठेवा. (कामेश्वरास) तुला सांगुन ठेवतों. यापुढं यांना कोणत्याहि प्रकारचा त्रास होता कामा नये.

कामे०—( नकारार्थ मान हालवितो. ).

अमर०—नवरा बायकोनं आनंदांत राहावं हिच माझी इच्छा. भोलानाथ, आपल्या उच्च वर्णीय ज्ञातीत त्यांतुन सभ्य ग्रहस्थानी कधीं कुठं स्वतःच्या बायकोला सोडल्याचं एक तरी उदाहरण आहे कां ?

भोला०—एक कां ? हजारो आहेत. अहो आपले बापुराव. त्यानी नव्हती का आपल्या बायकोला सात वर्षे सोडचिठ्ठी दिली. अहो, अमरनाथजी असं हे चालायचंच. विधिलिखीत चुकतं कां. ऋणानुबंधाप्रमाणें अशा आचरट नवर देवांच्या गांठी पडतात.

अमर०—( उठुन ) बरं भोलानाथजी, येतो आम्ही आतां. बरीच रात्र झाली. उद्यां यायचंच आहे याना न्यायला.

**भोला०**—बरं जांवयजी. विमटो, सोडा, लेमन, कांहीं मागवूं कां ?

[ कामेश्वर मानेनेंच नको म्हणतो व अमरनाथासह जातो. ]

**प्रभा**—[ स्मित हास्याने ] बाबा, या कपट नाटकाचा भाग आला कां तुमच्या लक्षांत. या नाटकांतील मुख्य खल नायिका, त्यांची ती पट्टराणी काळुबाई, बरं. त्या त्रिकुटानीं हा कपटी व्युह रचला असावा असं वाटतं.

**भोला०**—अग, अशा कपट नाटकाचे प्लॉट वाटेल तसे मला रंगावितां येतात बरं तुमचं हितगुज काय झालं ते सांग आधी.

**प्रभा**—कसलं हितगुज ! वहिनी संबंधी जो प्रश्न विचारला तो बाबाना कळला कां. असं विचारणं झालं. मी बळेंच म्हणालें नाही. नंतर घरी येणार का म्हणून विचारलं. मी म्हणाले तो बया तिथं असे तोपर्यंत मी यायचो नाही. झालं मग काय विचारतां स्वारी भडकली. तुम्हाला हांका मारल्या. पण बाबा अमरनाथला तुम्ही सांगितलं वाटतं.

**भोला०**—हो, मी सांगितलं.

**प्रभा०**—( हांसत ) पण विषय निघाला कसा ?

**भोलानाथ**— [ जांभई देउन ] ते सर्व उद्यां सांगेन. रात्र बरिच झाली. आता मी झोंपतो. तुलाहि उद्यां नवऱ्याच्या घरीं जायचं आहे ना ? तर आता स्वस्थ झोंप. आजची रात्र इथं ! आणि उद्यां तिथं ! [ जातो ]

**प्रभा**–[भोलानाथ गेल्यावर स्वगत] काय म्हणाले बाबा, आजची रात्र इथं आणि उद्यां ! उद्या तिथं ! (आकाशाकडे पाहुन) अगबाई, पण हें काय ! या आकाशांतील तारा, माझ्याकडं पाहुन कां बरं हांसताहेत. मी माझ्या, पतिदेवाकडं जाणार, म्हणून कां या मला हांसतात ? हांसा ! हांसा ! तारानो हासा बरं, हांसा !

### पद १४ वें.

**कां या साऱ्या हांसती मला तारा । वरि तोरा वांया । सा. ।**
**केवीं उगवे दिन उदयींचा । विचार सुखकर पति मिलनाचा**
**भाव उमजुनी मम अंतरिचा । कां या. ।**
**प्रफुल्ल मन हें झालें । हृदयीं गुलाब फुललें ।**
**केवीं नंदन वन बनलें । कां या. ॥ १ ॥**

( जाते ) [ पडदा पडतो ]

---

प्रवेश ४ था. स्थळ—रस्ता.

बापुराव—( प्र. क. स्वगत ) स्त्रिया! मग त्या यंग असोत वा ओल्ड असोत, त्यांनी घरांतील कोणतेंहि काम स्वतंत्रतेन करतां कामा नये. स्त्रियांनी बालपणी फादरच्या स्वाधीन आणि तरुणपणी हजबंडच्या स्वाधीन आणि पतिनंतर पुत्राच्या स्वाधीन राहिलं पाहिजे. स्त्रियांनी सेपरेट राहण्याची इच्छा कधींही करू नये. जी स्त्री पतिला सोडुन विभक्त होते. ती उभयकुलाना कलंक लावते. स्त्रियांनी गृहकृत्यांत दक्ष असावं, संसार ठाकठीक करावा. या शिवाय स्त्रियांचं कर्तव्य ते काय असणार.

[ इतक्यांत दादासाहेब येतात त्यास पाहुन नमस्कार करतो. ]

या. आज स्वारी एकटीच. दोस्त कुणीकडं?

दादा०—भोलानाथ आज चौपाटीवर कुठं दिसला नाही बुवा.

बापुराव—अलिकडं तुमची भोलानाथशी अगदी गट्टी जमली आहे. अगदीं मांडीला मांडी भिडवुन बसतां चौपटीवर.

दादा०—( हास्य मुखाने ) अहो कसली गट्टी आणि कट्टी घेवुन बसलांत. त्यातलं इंगित तुमच्या नाहीं लक्षांत यायचं. जावं त्याच्या वंशी तेव्हां कळे.

बापु०—इंगित! इंगित ते कसलं बुवा. ऐकुं द्या तर खरं.

दादा०—ऐकायचं काय? आमच्या कामेश्वराचं लफडं चाललं आहेना तूर्त. तेव्हा भोलानाथला युक्तिप्रयुक्तीनं खुलवुन त्याच्या मनातील भेद काढायचा आणि आमच्या विरोधक भाऊजीना रिपोर्ट द्यायचा. समजलं बापूसाहेब!

बापु०—[ मान हालवित ] आय सी. एकंदरीत आपण सी. आय. डीचा पेपा पकरला आहात म्हणायच्ना. गुड, गुड!!

दादा०—ते जाऊंद्या हो. पण एक ताजी बातमी समजली कां?

बापु०—ताजी बातमी? ती कोणती!

दादा०—अमरनाथ आणि कामेश्वर भोलानाथच्या घरी गेले; आणि तिथं म्हणे नर्मदेशी समेट केला आणि दुसऱ्या दिवशी नर्मदेला घरी न्यायचं ठरलं. नंतर म्हणे फिसकटलं.

**बापु०**—म्हणजे. जाळ्यात सांपडलेला मासा सोडला म्हणता.

**दादा०**—पुढं ऐका. नंतर भोलानाथनी कामेश्वराला म्हणे एक पत्र पाठविलं कीं चार दिवसाच्या आत तुम्ही तुमच्या पत्नीस न घेवुन गेलात तर मोठ्या दिलगिरीनं कायदा पहावा लागेल.

**बापु०**—आहे मला ठाऊक. ते पत्र घेऊन माझ्याकडं कामेश्वर आला, आणि भोलानाथला सॉलिसीटर्सची नोटीस पाठविण्याचा आग्रह धरला. शेवटी मी ड्राफ्ट करून त्या नोटिशीवर आमच्या सॉलिसीटरची सही घेतली. नंतर धडकावली नोटीस भोलानाथला न काय ! ( खिशांतुन कागद काढुन ) ही पहा त्या नोटिशीची कॉपी. ( दादासाहेबांना देतो )

**दादा०**—( नोटिशीची पानें चाळीत ) अबबबब, कायहो, बापुराव, ही नोटीस कीं, टाईम्स ऑफ इंडियाचा अंक ! ही दहा पानाची अगडबंब नोटीस वाचतां वाचतां तो भोलानाथ बिचारा हैराण झाला असेल;[पुन्हां वाचतो.]बापुराव तुम्ही तर कमाल केलीत बुवा, एकंदरीत सर्व खापर त्या भोलानाथच्याच माथी मारलत.

**बापु०**—अहो. हा तर आमचा लॉ पॉईंट आहे. आम्ही सॉलिसीटर्सच्या फर्ममधील माणसं आम्हाला कुणी शिकवायला का हवं. लाल बुकांतिल कायदे. हिरव्या बुकांतील कायदे, काळ्या बुकांतील कायदे. अशा कितीतरी प्रकारच्या कायद्याचा भरणा आमच्या या सुपीक डोक्यांत असतो. आम्ही कांही नॉमिनल-सेल्समन नव्हत असो. एकंदरीत आतां हे प्रकर्ण विकोपाला जाईलसं दिसतं. तो भोलानाथ कांही स्वस्थ बसायचा नाही.

**दादा०**—मग आतां पुढं कसं करायचं.

**बापु०**—आहे. त्याला उपाय आहे. पण तो तुमच्याकडन् होण्यासारखा आहे.

**दादा०**—काय ? माझ्या कडून ?

**बापु०**— हो, हो, तुमच्याकडन. असं पहा एक वेळ तुम्ही कामेश्वराच्या घरी जायचं आणि—

**दादा०**—( मधेंच ) कोणी मी ? आणि त्यांच्या घरी ? नको रे बुवा आपल्याला त्या भानगडी.

**बापु०**—अहो भानगडी कलल्या दादासाहेब !

**दादा०**–कसल्या ह्मणजे ? बापुराव ऐका. मी सांगतों तें ऐका प्रथम. एकदां असं झालं ! आमच्या माईकडं मी रात्रीच्या वेळीं सहज गप्पा मारायला म्हणून गेलों होतो. बोलतां बोलता बरीच रात्र झली. तेव्हां मी निघालों घरी जायला, इतक्यांत सहज माझी नजर वळली आणि ( मधेंच हांसत ) पहातो तो काय हो बापुराव, ती नर्मदा झोंपली माईच्या शेजारी आणि कामेश्वराच्या खोलींत विषयेची पथारी !

**बापु०**—[ विस्मयानें ] काय, सांगतां काय दादासाहेब ! प्रत्यक्ष तुम्ही पाहिलं म्हणता !

**दादा०**—अहो पाहिलं इतकंच नव्हे तर त्या विषया बाईला हें असं कां ? म्हणून विचारलं सुद्धां आणि मग काय सांगु बापुराव तुम्हाला. तिचा झाला जळफळाट ! मी धरली घरची वाट !

**बापु०**—अहो पण तिला विचारायला तुम्हाला धीर तरी कसा झाला आँ !

**दादा०**–मग झालं काय ! मी कुठं तिची पर्वा करतो. माझं काय करणार ती.

**बापु०**—पण कायहो. हे अस माईना रुचतं कसं ! आणि ती नर्मदा सहन तरी कशी करीत होती !

**दादा०**—अहो माईचीच तर त्या विषयेला सम्मती ! आणि नर्मदा बावळट! झालं जुळलं ! [ रिस्टवॉच पाहुन ] बरं बापुराव, बराच वेळ झाला. येतो मी. पण हे पहा हें सारं गुप्त ठेवायचं बरं !

**बापु०**—छे, छे. त्याविषयीं अगदीं निर्धास्त असा. ऑल राईट.

[ सेक्यांड करून दोघे जातात ]

---

## प्रवेश ५ वा.

[ **स्थळ**—कामेश्वराचें घर. कामेश्वराची वाट पहात विषया जांभई देत बसलेली दृष्टीस पडते. वेळ मध्यरात्र. पडदा उघडतो. ]

**विषया**—( जांभई देवुन ) काय बाई करणार ! तीन वाजुन गेले, तरी अद्यापी काकांचा पत्ता नाही. त्या रंभेकडं राहिले की, काय नकळे. माई आणि ते केव्हांच झोपले. पण मला बाई कशी ती झोपच येत नाही. बरं मी झोपत नाही म्हणून माझ्याकडं आमच्या ह्यांची सारखी पिर पिर ! किती सांगा. किती बोला, त्याना कांहीच नाही. करणार काय ! पदरी पडले आणि समूळ घसरले. [ जांभई देत ] अजून कां बरं आले नाहीत—

पद १५ वें

**कां नच ये सदना प्रिय काका ॥ कां. ॥**
**चैन पडेना कांहि सुचेना ॥ कां. ॥**
**पाडिल भूरळ सवत तयाना ।**
**ऐशा मन्मनिं येति कल्पना ॥ १ ॥**

**बंडोबा**—[ डोळे चोळीत प्र. क. ] तीन वाजून गेले झोपायचं नाही का तुला ? रात्रभर जागुन प्रकृती नाहीका बिघडणार ?

**विषया**—आले डोळे चोळीत. जा झोंपा जा. काका येईपर्यंत मी अशीच जागत राहणार.

**बंडोबा**—अग पण भिती वाटते ना एकट्याला मला खोलीत.

**विषया**—पुरुषासारखे पुरुष आणि भिता कोणाला ! बोलुं तरी नका. कोण ऐकतील तर हांसतील. जा. झोपा जा मुकाट्यान.

**बंडोबा**—पण माझ्या सोबतीला कोणी नाहि ना. तूं जवळ असलीस की मला गाढ झोप लागते.

**विषया**—( वेडावुन ) गाढ झोप लागेल. माझी तुम्हाला कितीशी कळकळ आहे ते आहे ठाऊक. चला जा इथुन. काका आल्या शिवाय हालायचीच नाही. मी. ( आकाशाकडे पाहुन ) अग बाई. उजाडलं. ( बंडोबास पाहुन ) अजून तुम्ही उभेच ! जा म्हणते ना मी ! ( ओचा खोचीत उठते व बंडोबाच्या अंगावर खेकसते ) जाता किंवा नाही झोपायला. चला निघा चला.




विषयाः—जातां कीं नाही झोपायला ? [ अंक ३ पान ६० ]

**बंडोबा**—( घाबरून ) बरं माझ्या बये जातो मी.

( बंडोबा विषयेकडे भीत भीत पहात निघुन जातो )

**विषया**—गेली एकदाची पीडा. ओवाळली.

( इतक्यांत कामेश्वर प्रवेश करतो )

काय हे काका,सबंध रात्रभर तुमचा पत्ता नाही हें काय ? देवाला नवस करण्याच्या बेतात होते मी.

**कामे०**—अहो पण हा तुमचा देव समोर उभा असतां दुसऱ्या देवाला नवस काय म्हणून करायचा. [ तिच्या खांद्यावर हात ठेवतो ]

**विषया**—हो तुम्हाला काय, सारी बाई थट्टा. तुम्ही नसल्यामुळें माझा जीव सारखा तळमळायला लागला म्हटलं की त्या रंभेच्या मोहांत सांपडलांत कीं काय.

**कामे०**—[ तिच्या पाठीवरून हात फिरवित ] छे, छे, लाडके वहिनी तुमच्या शिवाय या जीवाला कोणाचाच मोह पडायचा नाही. मी आणि अमर तात्या रात्री तिथून निघालो इतक्यांत रस्त्यांत एक फ्रेंड भेटला त्यानें आम्हाला बोरिवलीस नेलें, आणि आतां पहिल्या गाडीला आह्मी आलों. तुं विचारांत पडशील असं मला वाटलंच.

**विषया**—बरं ते जाऊं द्या. त्या रंभेकडे काय झालं ते सांगा.

**कामे०**–सर्व सांगतो, प्रथम माझी तंबाखुची मशिरी तयार करून आण पाहुं. [ विषया जाते ] [ स्वगत ] मी लग्न उगाच केलं. त्यापेक्षां आजन्म ब्रह्मचारी व्रतानं राहिलों असतो, तर झाल्या गेल्या गोष्टीवर पडदा पडुन सर्व कांहीं गुलदस्तात राहिलं असतं. तरी पण मी विशेष ते काय करतों. लोक बेटे मूर्ख आहेत त्यांच्या तोंडाला हात कोण धरणार. बस्स. तें कांही असो. माझं खरं प्रेम वहिनीवरच—

पद १६ वें.

**नाही मोल प्रीतिला । प्रिय वहिनिला देह वाहिला ।**
**पंच पांडवा प्रियतम झाली । द्रौपदि परि ती सतिसम गणिली ।**
**नच कुणि निंदा त्यांची केली । मग जन कां हांसती मला ॥१॥**

[ इतक्यांत विषया माशिरी घेऊन येते व कामेश्वरास देते ]

वहिनी. खरंच मी लग्न केलं नसतं. लग्न करून माझा मीच नाश करून घेतला.

**विषया**—म्हणजे असं काय बोलता काका. काय झालं काय ? ती सटवी अधिक उणं कांही बोलली वाटत ! येणार का वया इथं !

**कामे०**—नाही, जोंपर्यंत तुह्मी इथं आहात तोंपर्यंत ती यायची नाही.

**विषया**—ह्मणजे माझ्या नांवाचा त्या अवदसेला रोग काय. ठीक. तर मग काका त्या हलकटेला आतां माझ्या घरांत मुळीच आणतां कामा नये. तिला जर इथं आणली, तर मी माझ्या जीवाच बरं वाईट करून घेईन. कशी सटवी येते ते पाहीन मी. या घरांत मी आहे तोंपर्यंत ती यायची नाही काय ! अग सटवे !!

**कामे०**—बरं पण अमर तात्यानं तिला उद्यां तुह्माला घेऊन जावुं असं सांगितलं आहे. त्याचं कसं करायच ?

**विषया**—चिंता नाहीं. मी सांगते कसं करायचं ते. चला आंत.

[ उभयता जातात तोंच शिवजीसह पोलीस शिपाई येतो व दरवाजा बंद ह्मणुन दारावर थाप मारतो. लगेच कामेश्वर दरवाजा उघडुन बाहेर येतो.]

**शिपाई**—[ राम राम करून ] कामेश्वर भद्रेश्वर प्रियोळकर आपनच का ?

**कामे०**—होय मीच तो का बर !

**शिपाई**—हे समण घेवा, आनी [दुसरा कागद देवुन] हेचार तुमची सय करा.

**कामे०**—[ समन्स घेवुन वाचुं लागतो, नंतर शिपायास ] जरा थांबा हां. मी आतून येतो. [ आत जातो. ]

**शिपाई**—घरकारनीक इचारूक गेलोसो दिसता हां.

**शिवजी**—अरे नाय, ये तो समन्स येच्या बायडीच्याच हाय.

**शिपाई**—आस्सां, घरकारनीन खटलो केलो हा घोवार.

**शिवजी**—हां, हां.

**शिपाई**—मगे हो भूतूर कोनाक इचारुक गेलो हां तर !

**शिवजी**—ते तो येच्या मोट्टा बायच्या बायडी हाय नाय तेला दाकवायला. गेलाय. घरमंदी शमदा गडबडगुंडा हाय.

**शिपाई**—आरच्या. इला ध्यानात

( इतक्यांत कामेश्वर बाहेर येवून कांपऱ्या हाताने कागदावर सही करून शिपायास देतो. शिपाई राम राम करून जातो. ) [ ड्राप पडतो ]

— अंक ३ रा समाप्त —

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**—गंभीर वकिलाचें ऑफिस.

( टेबलावर मोठमोठी कायद्याची पुस्तकें, वर्तमान पत्रें, ब्रीफें पडलेली असून एका बाजूस घंटा, तारखेचे क्यॅलेंडर कलमदान वगैरे आहे. बाजुच्या खुर्च्यांवर विरोधक व कामेश्वर, बसलेले असा देखावा. पडदा उघडतो. )

**विरोधक**—ग्या नीच भोलानाथान, अखेर क्रिमिनल कोर्टापर्यंत धांव घेतली अँ! आमच्या या पांढरपेशा समाजात श्वशुरानं जामातास कोर्टात खेचल्याचं हे पहिलच उदाहरण होय. असो. चिंता नाही. खटल्याची फर्स्ट हिअरींग तर झाली, त्यावेळीं उभय पक्षात तडजोड व्हावी असं ठरलं होतं. आणि म्हणून त्याबद्दलचा विचारविनीमय करण्याकरितां आमच्या वकील साहेबान आज या ठिकाणीं मिटींग भरविण्याचं ठरविलं; परंतु अद्याप वकिल साहेबांचा तसंच इतर मंडळीचा पत्ताच नाही.

**कामे०**—आजच्या मिटिंग संबंधी मी आपल्या गंभीर साहेबांना भेटून विचारलं होते. ते म्हणाले की साडेपांच ते सहा पर्यंतची अपॉइन्टमेंट त्यांच्या समर्थ वकिलाना दिलेली आहे, आणि आपले बापुराव गंभीर साहेबांबरो बर येणार आहेत.

**विरोधक**—समजल. येणार आहेत. होणार आहे. करणार आहेत. परंतु सहा वाजून गेले तरी एकाचाही ठिकाणा नाही. आम्ही तरी तिष्टत कां बसाव.

( इतक्यांत मोटारीचा हॉर्न वाजतो व घाईघाईनें गंभीर वकील व बापुराव येतात. गंभीर हॅट व ब्रिफे टेबलावर ठेवतात. )

**गंभीर**—( खुर्चीवर बसतां बसतां) गुडइव्हीनिंग सर! ( सिगार पेटावितो) (विरोधकास ) आपल्याला येवून बराच वेळ झाला असेल.

**विरोधक**—सव्वा पाचला आलों होतो. कारण साडेपाचची अपॉइन्टमेंट तेव्हां म्हटलं पंधरा मिनिटं पूर्वीच हजर असलेलं बरं. ( स्मित हास्यानें ) आपल्यालाच वेळ झाला.

**गंभीर**—( सिगारचे झुरके मारीत ) नो, नो, अवर अपॉइन्टमेन्ट वॉझ बिटविन फाय थर्टी. अन्ड सिक्स [ रीस्ट वाच पाहुन ] आता साडेसहा झाले. ओनली हाफ अन अवर मला लेट झाला. डझन म्यॅटर ! आजची मिटींग म्हणजे उभयपक्षी सेटलमेंट करायची.

**बापु०**—पण त्या मंडळीचा अद्याप मागमुस नाही हे काय ? (गंभीरास ) बॉयला पाठवुं कां समर्थांच्या ऑफिसात.

**गंभीर**—[ सिगारचा धूर काढीत ] जस्ट वेट आलिटल ! [ विरोधकास वेल मिस्टर विरोधकजी ती मंडळी येण्यापूर्वी तुमचा नक्की विचार काय तो कनफर्म करा, म्हणजे मग त्याप्रमाणं पुढं काय करायचं ते करूं.

**बापु०**—एकझ्याक्टली, प्रथम आपण कंसल्ट केलेलं बरं. कारण, सुट आहे मेनटेनन्सची. तेव्हां मेनटेन्स द्यायचा नक्की विचार असला तर काय ती फिगर फिक्स करा. बरं तसं नसलं तर समेटाची रूपरेषा आंखा.

**गंभीर**—समेट झाला तर फार उत्तम. आय शॅल बि व्हेरी ग्ल्यॅड.

**विरोधक**—आपल्याला वाटेल तसं करा. तुम्ही लीगल माणसं. लॉ पॉइन्टस तुम्हाला ठाऊक.

**गंभीर**—[ मान हालवित ] यस राईट ! वेल मिस्टर कामेश्वर, व्हाट यु वुयश. मेन्टेनन्स द्यायचं की समेट करायचा. बोला.

**कामे०**—समेट करायचा असता तर तो केव्हांच केला असता, मग एवढी कोर्टापर्यंत पाळी कां आली असती.

**गंभीर**—नाहितर मग मेनटेनन्स.

**विरोधक**—हो, हो, मेनटेनन्सच द्याव म्हणजे करकट नाही. दहा रुपये द्यावे.

**गंभीर**—काय टेन रूपीझ ! छे, छे, ते ॲक्सेप्ट करतील असं मला नाही वाटत.

**विरोधक**—नाहीतर फायव्ह मोअर ( हांसतो. )

**गंभीर**—यस, फिपटीन रिझनेबल. पण ते त्यानें अक्सेप्ट केले पाहिजेत.

[ इतक्यांत मोटारीचा हॉर्न वाजतो ]

मीस्टर समर्थ आले वाटत. हा आवाज त्यांच्याच कारचा—

[ समर्थ व भोलानाथ येतात ]

गुडइव्हनिंग मीस्टर समर्थ, बसा. [ भोलानाथास ] टेक युवर सीट प्लीज. [ समर्थ व भोलानाथ खुर्च्यांवर बसतात ] आज किंचित् अपायन्टमेंट घसरली मिस्टर समर्थ. कारण माजगांव कोर्टात त्या नवरोजी बायकोजी. पोरवाल्याच्या खटल्यात माझा बराच वेळ गेला. आणि त्यामुळं मला लेट झाला

**समर्थ** ( मान हालवुन ) अस्स. बरं आतां प्रारंभ करूं या.

**गंभीर**—यस. ( असे म्हणुन सिगारचा एक झुरका मारुन टेबलावरील कागद चाळतो.) वेल माय फ्रेंड मिस्टर समर्थ, इट इझ बेटर टु सेटल अॅमिकेब्ली. सामोपचारानं तडजोड झालेली बरी. आमच्या क्लाईटच म्हणणं असं की, त्यांच्या वाईफनं स्वसंतोषानं व राजीखुषीनं आपल्या घरीं यावं. त्याना कुणीच प्रतिबंध करणार नाही, तुमच्या क्लाईटच काय म्हणणं ?

**समर्थ**—त्या घरांत जायचा माझ्या क्लाईटची मुळीच इच्छा नाही. त्यांच म्हणणं असं की, तुमच्या क्लाईटनं विभक्त राहावं, अथवा फादर इन लॉ कडं राहावं. तसंच फादर इन लॉचं म्हणण अस की, जामातानं एक पैचाही खर्च करुं नये. आपलंच घर आपलाच संसार असं समजून आनंदानं राहावं; आणि फादर इनलाच्या पश्चात सर्व मालकी जामातांची.

( बापुराव, कामेश्वर, व विरोधक एकमेकांकडे थट्टेने पाहुन )

स्मित हास्य करतात. )

**गंभीर**—[ मान हालवित ] आयसी. एकुण फादर इनलॉचं म्हणणं कांही गैर नाही. मुलीच्या कल्याणाकरितां कोणताहि बाप असंच सांगेल.

**विरोधक**—( चेष्टेने) खरंच, हा अनफॉरचुनेट, माझ्या सारख्याला जर कां असा श्वशूर लाभला असता, तर रोज मी त्याच्या पायाचं तीर्थ घेतलं असतं.

( बापुराव व कामेश्वर हांसतात. भोलानाथ व समर्थ एकमेकाकडे पहातात )

**गंभीर**—वेल मिस्टर कामेश्वर तुमचं म्हणणं काय ?

**कामे०**—मी विभक्त मुळीच होणार नाही. पाहिजे तर तिनं
आमच्या घरी येऊन राहावं. माझी हरकत नाहीं.

**गंभीर**—तुमच्या वाईफची त्या घरांत जाण्याची इच्छा नाहीं. आणि
म्हणणं विभक्त व्हायचं नाहीं. तेव्हां हा मोठा पेंचच पडला म्हणायचा.
नाही तर मग मेन टेनन्स शिवाय दुसरा अन्य उपायच नाहीं.

**कामे०**—नेव्हर माईंड.

**समर्थ**—तर मग आतां मेंनटेनन्सचा फिगर ठरवा.

**गंभीर**—यस, असं पहा मिस्टर समर्थ; माझ्या क्लाईटची फ्यॅमिली
आणि इनकम पोटापुरतं, तेव्हां माझा क्लाईट फक्त पंचविस रुपये देऊं
त्यापेक्षां अधिक देण्यास तो असमर्थ आहे.

**समर्थ**—टवेंटी फायव्ह. ( मान हालवित ) नो, नो. वुय डोन्ट अॅक्से

**गंभीर**—मग तुमचा फिगर काय.

**समर्थ**—अॅट लीस्ट फॉर्टी घेऊं.

**गंभीर**—काय फॉर्टी ?

**समर्थ**—यस, फॅार्टी.

( कामेश्वर विरोधक व बापुराव एकमेकाकडे तटस्थ वृत्तीनें पाहतात

**बापु०**—मी असं म्हणतों, मेनटेनन्स पेक्षां अॅमिकेब्ली सेटलमेंट के
बरं. कारण तूर्त या जोडप्यात जरी रागाचा वणवा पेटला आहे तरी कांही
तो विजण्याचा चान्स आहे.

**विरोधक**—बापुराव, आपण म्हणता त्या प्रमाणं जरी वणवा विजला
तो धुमसत असायचा. आपलं काय म्हणणं गंभीर साहेब.

**गंभीर**—बापुचं म्हणणं मला योग्य वाटतं. कारण हे कपलयंग,
पांढरपेशा समाजांतील उच्च वर्णिय ज्ञातीतील नवरा बायकोनं विभक्त होणं
लांछनास्पद नव्हे का ? बरं कोर्टात केस प्रोसीड झाली, तर उभय
धिंडवडे निघायचे, तेव्हां मिस्टर समर्थ, कंसल्ट युवर क्लाईंट, आणि
फार्टीपेक्षां कांही कमी होत असल्यास.

**समर्थ**—ऑल राईट.

( समर्थ व भोलानाथ एके बाजुस जाऊन आपापसांत कांही पुटपुटता
व नंतर येऊन आपल्या जागी बसतात. )

विरोधक—(कपाळास आठ्या घालुन)नो, नो,नो. पंचविसाचे वर मुळींच नाही.

गंभीर—नॉट मोअर दॅन टवेंटी फायव्ह. ऑल राईट. ( भोलानाथास ) बरं मिस्टर. आपल्याला कांही बोलायचं आहे का ?

भोला०—जिथं बोलण्यांत मुळीं अर्थच नाहीं. तिथं मी काय बोलुं. असं पहा. वकील साहेब, जांवयाची प्रतिष्ठा मुलीमुळं, मुलीला त्रास न व्हावा तिला सुखासमाधानानं नांदवावी. म्हणून तर मी माझ्या जांवयाला तुम्ही कांही खर्च करूं नका, माझ्याच घरी रहा. माझं आहे ते सारं तुमचच. असं आश्वासन दिलं होत; नाही तर मला काय जरूरी होती.कुचेष्टेशिवाय प्रतिष्ठा वाढत नसते. हेंच खरं.

गंभीर—( मान हालवित ) आयसी. नवरा बायकोनं आनंदान नांदाव अशी तुमची इच्छा आहे तर !

भोला०—अलबत, कां नाही असणार ! समेट व्हावा म्हणून मी बरेच प्रयत्न केले परंतु ते सर्व निष्फल झाले. शेवटी नाइलाजानं मला कोर्टाची पायरी चढावी लागली.

समर्थ—नाही तर असं करा. यांची वाइफ आमच्या ऑफिसात बसली आहे, तेव्हां यानी जाऊन स्वत: त्याना भेटून उभयतानी काय तो विचार-विनिमय करावा.

गंभीर—राईट. ( कामेश्वरास ) मग जाता का ? वाईफला भेटून आपसात सेटल करा.

( कामेश्वर विरोधकाकडे पहातो व विरोधक नकारार्थी त्याला खूण करतो. )

बापु—(कामेश्वरास) मग टाइम कशाला घालवितोस. जा. लौकर जाऊ नये.

कामे०—छट्. मला नाही जायच.

गंभीर—तर मग मिटींग बरखास्त करूं. कोर्टात जे होईल तें खर. मिस्टर समर्थ तुमचा फायनल फिगर नॉटलेस दॅन् थर्टी फायव्ह. आणि आमच्या क्लाईटच म्हणणं नॉट मोअर दॅन टवेंटी फायव्ह (उठुन) ठीक चला तर. गुडबाय.

[ पडदा पडतो. ]

---

**प्रवेश २ रा. स्थळ**—रस्ता.

**बंडोबा**—[ प्र. क. ] मला त्याचं कांहीं नाही ! आमच्या प्रकर्णाची ध्वजा हां हां म्हणतां चोहोंकडे फडकली. पण मला त्याचं कांहीं नाहीं. जिथं तिथं या टवाळ लोकांना आपला विषय माझ्या बायकोचा ! असेना मला त्याचं कांहीं नाहीं. तो भोलानाथ तर मला ब्रह्मरामंधा प्रमाणं वाटतो. आमचा खटला कोर्टात गेला, आणि लोकांना मात्र तमाशा दिसला. बाकी मला त्याचं कांही नाही. त्या कामुला किती सांगितलं, तर तोही ऐकत नाही. एकंदरीत काय ! कामुच्या आणि आमच्या तिच्या मुळं सर्व कुटुंबाला मात्र खाली पाहावयाची वेळ आली आहे बाकी मला त्याचं कांही नाही.

**बापुराव**—( प्र. क. ) व्हाट यु टॉक मिस्टर बंडोबा. तुम्हाला कांही नाही परंतु आम्हाला आहेना ? अहं! तुमच्या तोंडाला काजळ फांसायचा घाट त्या भोलानाथानं चालविला असून तुम्ही बोलता मला कांहीच नाही ! शेम !

**बंडोबा**—नाही हो खरंच नाही. मला त्याचं कांही नाही. हे बघा, बापुराव माझ्या वाईफवर जर कां तो भोल्या उठेल. तर ती त्याचा खरपूस समाचार घेइल. आहोत कुठं अँ. [ डुलतो ] [ इतक्यांत कामेश्वर येतो. ]

**बापु०**—( कामेश्वरास) कोण, कामेश्वर, ठीक झालं अगदी वेळेवर आलास. उद्यां आपल्या केसचा निकाल लागायचा आहे. तेव्हां गंभीरांची तुला एक महत्वाची सुचना आहे.

**कामे०**—( आश्चर्यानें ) काय, गंभीराची मला महत्वाची सुचना ? आणि ती कसली ?

**बापु०**—ती हीच कीं, दोन्ही वेळीं, अपटुडेट पोशाखात तूं कोर्टात गेला होतास तसा ड्रेस उद्यां करावयाचा नाही. निव्वळ गबाळ ड्रेसांत कोर्टात जायचं. टाय, कॉलर, प्यँट, शॅर्ट, सर्वांना चाट द्यायचा, कारण तुझ्या वेशा-वरन तुझी परिस्थिती गारिबीची आहे, असं मॅजिस्ट्रेटला वाटलं की, मेनटेनन्सचा फीगर कमी होईल.

**बंडोबा**—होरे बाबा हो, नाहि तर करशील थाटमाट आणि हाती येईल चिनपाट. लावशील कॉलर, नेकटाई, आणि म्यॅजिस्ट्रेट समजेल हा धनशेट भाई.

वाकी मला त्याचं कांही नाही. बापुराव तुम्ही सुद्धां उद्यां कोर्टांत जा याच्याबरोबर. मी आलों असतों परंतु ती लोकांची दाटी पाहिली की माझं चित्त भडकत

**बापु०**— मी जाणारच. जिथं गंभीराची स्वारी, तिथं या बापुची फेरी ! अहो कोर्ट म्हणजे काय ! आमचं माहेरघरच ते.

**बंडोबा**—पण कृपा करून माझ्या बायकोला कोर्टांत न आणविण्याची खबरदारी ठेवा बुवा.

**बापु०**—नॉन्सन्स ! आम्हाला इतकं का डोकं नाही बंडोबा, तुमच्या बाइफला जर कोर्टांत आणली, तर आह्मा सर्वांची नाकं ठेवणीं जाणार नाहीत कां. ( रिस्ट वॉच पाहुन ) बरं कामेश्वर, गंभीरांच्या सुचनेप्रमाणं वागायचं बर का ? मी येतो आतां. ( बंडोबास ) चला येता कां बंडोबा.

**बंडोबा**—हो, हो, चला. मला त्याचं कांही नाही.

[ बापुराव व बंडोबा जातात ]

**कामे०**—( सखेद ) माणसांची पोजिशन त्यांच्या वेषावरून गणली जाते. एक नुर आदमी, दसनूर कपडा. असं म्हणतात ते खोटं नव्हे. अपटुडेट पोषाखात दोन वेळां मी कोर्टात गेलों, आणि तोच मी कामेश्वर उद्यां जर भिकार वेषांत गेलों तर मी जंटलमन तरी कसा दिसेन ! चोर, मवाली, बदमाष, कोणीही असो. अपटुडेट पोषाखात असला, कीं तो झालाच जंटलमन. आतां असा गबाळ ड्रेस करावा तरी कसा—

**पद १७ वें.**

**स्विकार करावा कसा त्या दीनवेषा ।**
**शोभेना मजसमान, अपटुडेट पुरुषां ॥**
**शॉर्ट कोट; बूट प्यँट, । डोईवरि फेल्ट हॅट ।**
**डोळ्यावरि स्पेक्टस उचित । जंटलमन पेशां ॥ १ ॥**

( जातो. )

———

### प्रवेश ३ रा.     स्थळ—कोर्ट.

(वकिल मंडळी खुर्च्यांवर स्थानापन्न झाली आहे, प्रेक्षकांचा गोंगाट चालला आहे, मधून मधून शिपाई खामुष, चूप असे ओरडत आहेत, इतक्यांत भोलानाथ, प्रभा, समर्थ व शिवजी येतात व आपापल्या जागी बसतात, नंतर गंभीर, बापुराव, व कामेश्वर येवुन आपापल्या जागी बसतात एके बाजूस इंटर प्रिटर बसलेला असा देखावा घड्याळांत बाराचा ठोका होतो तोच म्यॅजिस्ट्रेट येतात सर्व उभे राहतात व नंतर बसतात.)

(इंटर प्रिटर खटल्याचे कागद काढून म्यॅजिस्ट्रेटास देतो)

**मॅजिस्ट्रेट**—[कागद वाचून] केस नंबर वन थाऊजंड !

**इं. प्रि.**—नर्मदाबाई प्रियोळकर, कामेश्वर प्रियोळकर.

**शिपाई**—(मोठ्यानें) नर्मदाबाई पिरयळकर ! नर्मदाबाई !

(नर्मदाबाई येते. इंटरप्रिटर तिला बॉक्समध्ये उभे राहण्यास सांगतो व नर्मदा बॉक्स मध्ये उभी राहते.)

**शिपाई**—(पुन्हां) कामेश्वर पिरयळकर, कामेश्वर !

[कामेश्वर एके बाजूस उभा राहतो म्यॅजिस्ट्रेट नर्मदेस व कामेश्वरास न्याहाळून पहातो.]

[समर्थ व गंभीर मॅजिस्ट्रेट समोर उभे राहतात.]

**समर्थ**—युवर वर्शीप पिटिशनर नर्मदा बाई प्रियोळकर तर्फे मी उभा आहे. केस मेनटेनन्सची आहे. (बसतो.)

**गंभीर**—रेसपॉंडन्ट मिस्टर कामेश्वर प्रियोळकर तर्फे मी उभा आहे. युवर वर्शीप (बसतो)

**मॅजि॰**—(कांही वेळ कामेश्वर व नर्मदाबाई यांच्याकडे नीट पाहुन) व्हाट क्लास दीज पार्टी बिलॉंगस टू ?

**समर्थ**—[उठुन] हाय क्लास ब्रम्हीन युवर वर्शीप.

**इं. प्रि.**—(नर्मदेच्या हातात गीता देऊन) बोला ईश्वर साक्ष खरं सांगेन. खोटं सांगणार नाही.

**नर्मदा**—(हातात गीता घेवुन) ईश्वर साक्ष खरं सांगेन. खोटं सांगणार नाही. (गिता देते.)

**समर्थ**—तुमचं नांव ?

**नर्मदा**—नर्मदा बाई.

**समर्थ**—जात ?
**नर्मदा**—ब्राह्मण.
**समर्थ**—वय ?
**नर्मदा**—वीस.
**समर्थ**—तुमचं लग्न केव्हां झालं ?
**नर्मदा**—ता. १७ मार्च १९२५.
**समर्थ**—सासरी किती महिने होता ?
**नर्मदा**—सहा महिने.
**समर्थ**—तेवढ्या मुदतीत सासरच्या मंडळीनं तुम्हाला कस वागविलं ?
**नर्मदा**—फक्त एकच महिना चांगल्या रितीनं वागविलं.
**समर्थ**—नंतर ?
**नर्मदा**—नंतर मारहाण छळ चालविला.
**समर्थ**—त्याचं कारण ?
**नर्मदा**—( खाली मान घालुन ) त्याचं कारण—
**समर्थ**—बरं. तुम्हाला घराबाहेर केव्हां काढलं ?
**नर्मदा**—ता. १४ डिसेंबर १९२५ रात्रीं १२ वाजतां.
**समर्थ**—तुह्माला तुमच्या वडलाकडं नेताना तुमच्याबरोबर तुमचे यजमान होते का?
**नर्मदा**—हो.
**समर्थ**—त्या वेळी तुमच्या वडलाना ते भेटले का ?
**नर्मदा**—नाहीं. मला रस्त्यावर सोडून आपण निघुन गेले.
**समर्थ**—तुह्माला घराबाहेर घालविण्याचं कारण ?
**नर्मदा**—मी त्यांच्या इच्छे आड आलें म्हणुन.
**समर्थ**—म्हणजे ? तुह्माला त्यांची इच्छा अयोग्य वाटली होय ?
**नर्मदा**— हो.
**समर्थ**—ती कां ?
**मॅजि०**—थांबा. आलं माझ्या लक्षांत पुढं बोला.
**गंभीर**—(मधेच उठुन) युवर वर्शीप ! मला कांही प्रश्न विचारायचे आहेत.
**मॅजि०**—यस. मिस्टर गंभीर गो ऑन.
**गंभीर**—( कमरेवर हात ठेवुन नर्मदेस ) तुह्माला तुमचा नवरा पाहिजे का?
**नर्मदा**—हो.

**गंभीर**—( चष्मा सावरून ) सासुबाई हव्यात कां ?

**नर्मदा**—हो.

**गंभीर**—मग तुम्ही त्या घरांत जाऊं इच्छिता किंवा नाही ?

**नर्मदा**—ती बाई त्या घरात असेपर्यंत मी तिथं जाऊं इच्छित नाही.

**गंभीर**—मग नवऱ्यानं विभक्त व्हावं असं तुमचं म्हणणं ना ?

**नर्मदा**—हो.

**गंभीर**—बरं. विभक्त झाल्यावर सासुबाईबरोबर असल्या तर तुम्हाला मान्य आहे का ?

**नर्मदा**—आहे. मान्य आहे. पण ती बाई नको.

**मॅजि०**—( स्मित हास्यानं ) ऑल राइट मिस्टर गंभीर. एनीथिंग मोअर ?

**गंभीर**—नथींग युवर वर्शीप. ( असे म्हणुन बसतो ).

**इं. प्रि.**—( नर्मदेस ) चला.

[ नर्मदा बॉक्स मधून निघुन खुर्चीवर बसते. ]

**मॅजि०**—( कागद चाळून ) नाव रेसपांडन्ट.

**समर्थ**–[उठुन] पिटिशनरच्या फादरची साक्ष व्हावी अशी माझी विनंती आहे. माय ऑनर.

**मॅजि०**—[ टेबलावरील कागद चाळीत ] यस भोलानाथ सिद्धाप्पा ढेपें. हेच का फादर ?

**समर्थ**–यस माय ऑनर. [बॉक्समधें उभे राहावयास भोलानाथास खुणावतो.]

[ भोलानाथ बॉक्समध्यें उभा राहतो. इंटर प्रिटर भोलानाथच्या हाती गीता देतो, भोलानाथ गीता इं. प्रि. यास परत देतो. ]

**समर्थ**—पिटिशनरचे तुम्ही वडील. आणि रेसपांडन्ट तुमचे जामात ना ?

**भोला०**—हो.

**समर्थ**—तुम्ही मुलीचं लग्न केव्हां केलंत ?

**भोला०**—ता. १७ मार्च १९२५.

**समर्थ**—मुलीला भेटण्याकरितां तुम्ही तिच्या घरी जात होता का ?

**भोला०**—हो.

**समर्थ**—केव्हां जात होतां ?

**भोला०**—प्रत्येक शनिवारी दोनप्रहरी

**समर्थ**—तुम्हाला कुणाचं पत्र आलं होतं का ?

**भोला०**—हो. एक निनावी पत्र मला आलं होतं.

**समर्थ**—मग तुम्ही काय केलंत ?

**भोला०**—पत्र लिहिणाऱ्याच्या सुचनेप्रमाणं मी ते पत्र मुलीला दाखविलं.

**समर्थ**—पत्र वांचुन मुलगी काय म्हणाली ?

**भोला०**—ती म्हणाली, मी काय तें पाहीन.

**सम०**—ते पत्र, तुम्ही दुसऱ्या कोणाला दाखविलं का ?

**भोला०**—हो, माझ्या जांवयाचा मेव्हणा विरोधक, यांना दाखविलं.

**समर्थ**—तुमच्या मुलीच्या घरीं येण्याची बंदी तुम्हाला कोणी व केव्हां केली.

**भोला०**—तारीख ११ ऑगस्ट १९२५ पासुन मुलीच्या घरी येण्याची बंदी मला माझ्या जांवयानं केली.

**समर्थ**—तुमच्या मुलीला तुमच्या घरी केव्हां व कोणी आणली ?

**भोला०**—ता. १४ डिसेबर१९२५ रोजी रात्रौ बारा वाजता तिच्या नवऱ्यानं माझ्या घराकड आणून रस्त्यावर सोडली.

**समर्थ**—त्यावेळी तुमचे जामात तुम्हाला भेटले का ?

**भोला०**—नाही.

**समर्थ**—घराबाहेर काढण्याचं कारण तुम्ही मुलीला विचारलं का ?

**भोलानाथ**—हो.

**समर्थ**—तिनं काय सांगितलं ?

**भोला०**—ती म्हणाली, माझ्या नवऱ्याचा वहिनीशी बेरेपणा असून तिच्याच चिथावणीनं मला घराबाहेर काढलं.

**समर्थ**—नंतर तुम्ही काय केलं ?

**भोला०**—सुमारें महिनाभर वाट पाहुन नंतर ता. १६ जानेवारी १९२६ रोजी एक खासगी पत्र जांवयाला मी पाठविलं.

**गंभीर**—( मधेंच उठून ) आय वांट टु आस्क समथींग युवर वर्शीप.

**मॅजि०**—यस गो ऑन.

**गंभीर**—( भोलानाथास ) तुमच्या जांवयानं बायकोसह विभक्त रहावं असं तुम्हाला नाहीं का वाटत ?

**भोला०**—नाही.

**गंभीर**—तुमची मुलगी सासरी राहिली तर तुमची हरकत नाही ना ?

**भोला०**—मुळीच नाही. तिनं खुशाल राहावं.

**गंभीर**–[खालीं बसतां बसतां पुन्हाः उठून] तुम्हाला पगार काय मिळतो.

**भोला०**—पावणे दोनशें.

**मॅजि०**—मिस्टर गंभीर, येनीथिंग मोअर ?

**गंभीर**—नो युवर वर्शीप. [ बसतो. ]

( भोलानाथ बॉक्स मधून निघून खुर्चीवर बसतो. )

**मॅजि०**—नाव रेस पांन्डट. कामेश्वर प्रियोळकर .

[ कामेश्वर मॅजिस्ट्रेट समोर उभा राहतो. ]

**गंभीर**—तुमचं नांव ?

**कामे०**—कामेश्वर भद्रेश्वर प्रियोळकर.

**गंभीर**—धंदा.

**कामे०**—नोकरी.

**गंभीर**—तुम्हाला पगार किती मिळतो ?

**कामे०**—शंभर.

**गंभीर**— पिटिशनर म्हणतात ते खरं कां ?

**कामे०**—छट फॉल्स.

**गंभीर**—विभक्त राहावयाची तुमची इच्छा आहे का ?

**कामे०**—माझी जाईंट फॅमिली असल्यामुळं मला विभक्त राहणं शक्य नाही.

**गंभीर**—तर मग मेनेटेनन्स द्यायला कबूल आहात का ?

**कामे०**—हो.

( गंभीर बसतो. मॅजिस्ट्रेट कांही वेळ लिहितात. नतर तो लिहिलेला कागद इंटर प्रिटरशी देतात इं. प्रि. तो कागद कामेश्वरला देवुन त्यावर सही करावयास सांगतो.)

**कामे०**—( कागद घेतो तोच गंभीर याच्या कानात कांही पुटपुटतो ) ज्या अर्थी माझ्या पत्नीनं माझ्यावर अश्लील आरोप लादले, त्याअर्थी तिला नांदविण्यास मी इच्छीत नाही.

[ असें ह्मणून त्या कागदावर सही करुन इंटर प्रिटरशी देतो. इं. प्रि. मॅजिस्ट्रेटशी देतो. मॅजिस्ट्रेट स्टेटमेंट लिहितात. सर्व शांत राहतात. ]

**मॅजि०**—मिस्टर गंभीर, तुमच्या क्लाईंटच म्हणणं काय ? मेनटेनन्स किती देणार ?

**गंभीर**—( उठून विनयाने ) युवर वर्शीप, माझ्या क्लाईटला शंभर रुपये पगार मिळतो, परंतु त्यांतुन फंड वगैरे कापुन फक्त ऐशीं रुपये त्याच्या हातीं लागतात. शिवाय त्यांची फॅमिली मोठी आणि त्यांच्या बंधुचीही प्राप्ती थोडी तेव्हां तीस रुपयांपेक्षां जास्त रक्कम द्यायला माझा क्लाईट असमर्थ आहे. बरं पिटिशनरचा फादर, आयमिन मिस्टर भोलानाथ, हे एक सुखवस्तु व सधन गृहस्थ आहेत. या मुलीशिवाय त्यांच्यावर कुणाचंच डिपेंडन्स नाही. म्हणुन म्हणतो कीं, तीस रुपयांपेक्षां अधिक रकमेची ऑरडर न व्हावी. अशी मी रीक्वेस्ट करतो युवर वर्शीप.

**समर्थ**—[ उठून ] नो. नो. नो युवर वर्शीप. तीस रुपयात माझ्या क्लाईटचं भागायचं नाही. कारण तिच्या एजुकेशनला बराच खर्च लागेल तेव्हां निदान पसतीस सँकशन करावे. युवर वर्शीप.

**मॅजि०**—[ स्मित हास्याने ] फक्त पांच रुपयाचा डिफरन्स ना? मिस्टर गंभीर मला वाटतं पसतीसचा फिगर रिझनेबल.

**गंभीर**—[ उठुन ] शिवाय युवर वर्शीप. हे कपलयंग असल्यामुळं, शॉर्टली रीकाँसीलीयेशन होण्याचा चान्स आहे.

**मॅजि०**—[ हांसत ] यस. देन दॅट तुयल बीयमच बेटर. ठीक.

[ मॅजिस्ट्रेट बराच वेळ लिहितात, सर्वांचे डोळे निकालाकडे लागतात. सर्व शांत बसतात. ]

**मॅजि०**—[ निकाल वाचतात ] या खटल्याचा सारांश असा कीं, वादीची फिर्याद, वादीच्या फादरची साक्ष, व प्रतिवादीचं स्टेटमेंट, या सर्वांचा सूक्ष्म विचार केला, तर प्रतिवादीच्या वर्तनावर, वादीनं गंभीर स्वरूपाचा आरोप लादला असं प्रतिवादीचं म्हणणं आहे, आणि म्हणून प्रतिवादी वादीला पत्नीच्या नात्यानं वागविण्यास कबूल नसुन वादीला पोटगी देण्यास तयार आहे. तसंच वादीनं प्रतिवादीवर केलेले आरोप कांही अंशी विचार करण्यासारखे आहेत, म्हणून प्रतिवादीनं वादीला पोटगी दाखल दरमहा रुपये एकतीस दिले पाहिजेत, आणि ही ऑर्डर आज तारखेपासुन अमलांत आणली पाहिजे.

( मॅजिस्ट्रेट उठुन जातात व इतर लोक आपापसांत कुजबुजतात. सर्व जातात. पडदा पडतो. )

———

**प्रवेश ४ था. स्थळ**—रस्ता.

[ समर्थ, भोलानाथ, नर्मदा, व शिवजी प्र. क. ]

**समर्थ**—[ भोलानाथास ] माझ्या कार मधून जाऊं द्या यांना घरीं.

**भोला०**—नको. घर जवळच आहे. जाइल या शिवजीबरोबर. [ शिवजीस ] शिवजी हिला घरी पोंचीव. मी जातों परस्पर ऑफिसांत.

[ शिवजी व नर्मदा जातात ]

**समर्थ**—बरं मिस्टर भोलानाथ, संध्याकाळी मला ऑफिसात भेटा. नंतर पुढं काय करायचं तें पाहुं.

**भोला०**—[ कांही एक न बोलतां स्तब्ध उभा राहतो. ]

**समर्थ**–कां विचार कसला करतां ? आणखी कांही विचारायचं आहे का ?

**भोला०**—तसं नव्हे. मॅजिस्ट्रेट साहेबानं एकतीस रुपये सांगितलें त्यावेळी आपण किंचित डीसकशन करायला पाहिजे होतं म्हणजे मग पसतीसच दिले असते.

**समर्थ**–छे, छे. झालं तें ठीक झालं. असं बघा, भोलानाथ, मॅजिस्ट्रेटनं एकदा डिसिशन दिलं, कीं नंतर कुणालाच कांही बोलायचा राईट नाही. बरं येतो.

**भोला०**—या, पण मी म्हणतो, कीं, जरी डिसिशन दिलं तरी नंतर कांही बोलायचं असलं तर तेहि बोलूं नये. असा का कायदा आहे.

**समर्थ**—हो, हो, असा मुळी कायदाच आहे. [ घाई घाईनें जातो. ]

**भोला०**—[ स्वगत ] असा मुळीं कायदाच आहे ! मग आतां या पोरीनं काय करावं ! कुंकू लावून वैधव्यात कां दिवस काढावेत ! तो तिकडं खुशाल डोक्याला बाशिंग बांधून लग्न करतों, आणि हिनं मात्र कपाळावर हात मारीत का स्वस्थ बसावें ! सद्गृहस्थहो, कायदा नसेल तर कायदा करून घ्या. विधवा विवाहाचा कायदा नाहीं कां झाला ! सतीचा कायदा नाही का झाला. मग या असल्या कुंकू लावणाऱ्या विधवांना पुन्हां संसारात पडण्यासाठीं कायदा नको का करून घ्यायला ! मुलींच्या आईबापानो, आतां तुम्ही आपल्या मुलींच्या लग्नाचा भार आपल्या अंगावर घेऊं नका. जांवई मिळणार, या अभिमानानं मी अविचार केला, दूरचा कोण कसा असेल, याची शंका आली म्हणुन जवळचा शोधून काढला, तो असा दिवटा निपजला, “ **वाहवारे जांवई**”

**अंक ४ था समाप्त.**

अंक १ ला. पान. ११

पद.

कामे०:—सजविति शृंगार साजि ॥
वधु मुखासि वर विलोकीं ॥
मोहवि मन बाह्य रंगि ॥ धृ० ॥
वधुस्वरूप सावधानिं ॥
करि उदास वर न मानि ॥
स्वामिनि ती असुख भोगि ॥ १ ॥

अंक ४ था. प्र. २ रा. पान ६९.

भैरवी.

कामेश्वर—जगिं मान्यता पावे ॥ नटवि सजवि जरि,
मानव काया ॥ धृ० ॥
हीन मलिनसा घेप वराया ॥
लांछन भासे मनाला कां या ॥ २ ॥